# श्रीहरिनाम महामंत्र

[महामंत्राचा क्रम, ऐश्वर्य आणि माधुर्यमयी व्याख्या, हरिनामाचा महिमा, हरिनाम ग्रहण करण्याची प्रणाली आणि हरिनामात अपराधाचा विचार]



श्रीभक्तिप्रज्ञान गौडीय वेदान्त विद्यापीठ प्रकाशन



श्रीचैतन्य महाप्रभु, श्रीनित्यानंद प्रभु, श्रीअद्वैत आचार्य, श्रीगदाधर पंडित, श्रीवास प्रभु आणि गौर-भक्त-वृंद



श्रील जगन्नाथ दास बाबाजी महाराज



श्रील भक्तिविनोद ठाकूर



श्रील गौरकिशोरदास बाबाजी महाराज



श्रील भक्तिसिद्धान्त सरस्वती ठाकूर प्रभुपाद



श्रीश्रीमद् भक्तिरक्षक श्रीधर गोस्वामी महाराज



श्रीश्रीमद् भक्तिप्रज्ञान केशव गोस्वामी महाराज



श्रीश्रीमद् भक्तिप्रमोद पुरी गोस्वामी महाराज



श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त स्वामी महाराज



श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त वामन गोस्वामी महाराज



श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त त्रिविक्रम गोस्वामी महाराज



श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त नारायण गोस्वामी महाराज



हरि-नाम-माहात्म्य शिक्षा-गुरू श्रीश्रीमद् अनिरुद्ध प्रभू



श्रीश्रीमद् गौर-गोविन्द स्वामी महाराज



# श्रीब्राह्म-माध्व-गौडीय वैष्णव गुरु-परंपरा



श्रीश्रीगुरु–गौराङ्गौ जयतः

# श्रीहरिनाम महामंत्र

[महामंत्राचा क्रम, ऐश्वर्य आणि माधुर्यमयी व्याख्या, हरिनामाचा महिमा, हरिनाम ग्रहण करण्याची प्रणाली आणि हरिनामात अपराधाचा विचार]

श्री गौडीय वेदांत समिती आणि त्याच्या अंतर्गत भारतव्यापी श्रीगौडीय मठांचे प्रतिष्ठाता (संस्थापक) श्रीकृष्णचैतन्याम्नाय दशमाधस्तनवर श्रीगौडीयाचार्यकेशरी

**ॐ विष्णुपाद अष्टोत्तरशतश्री श्रीमद्भक्तिप्रज्ञान केशव गोस्वामी महाराजांचे**

अनुगृहीत

**त्रिदण्डिस्वामी**

**श्रीमद्भक्तिवेदान्त नारायण गोस्वामी महाराज**

यांच्या द्वारे संग्रहित आणि संपादित




**भक्तिप्रज्ञान गौडीय वेदान्त विद्यापीठ प्रकाशन**

**हेसरकट्टा, बंगळूर–५६००८८**

**प्रकाशक—** **श्रीपाद भक्तिवेदान्त दंडी महाराज**
**श्रीरंगनाथ गौडीय मठ, गुरुकुल व गोशाळा,**
**हेसरकट्टा, बंगळूर–५६००८८. कर्नाटक.**
**दूरवाणी ९३७९४४७८९५, ८०९५२४०३८७**
**ई–पत्रः bvdandi@gmail.com**
**संकेत–स्थळेः http://www.purebhakti.com**
**http://www.purebhakti.tv**

## महाराष्ट्रातील प्रचार केंद्र

**श्रीरंगनाथ गौडीय मठ आणि गोशाळा, मुक्कामः गाडेवाडी, पोस्टः बोरीबेल, तालुकाः दौंड, जिल्हाः पुणे**

जर आपल्याला आपल्या गावातील मंदिरात किंवा स्वतःच्या घरी श्रीमद्भगवद्गीता, श्रीमद्‌भागवत किंवा एकादशी माहात्म्य या विषयांवर विनामूल्य प्रवचन आयोजित करायचे असेल तर आमच्याशी खालील दूरध्वनी क्रमांकांवर संपर्क साधण्याची कृपा करावी. आम्ही गावोगावी जाऊन हरिनामसंकीर्तन व प्रवचन करण्याची इच्छा बाळगतो.

श्रीपाद जमदग्नी प्रभू (दूरध्वनी–९८५०५१९९०४); श्रीपाद हरिदास प्रभू (दूरध्वनी–९७६६३३०२०३); श्रीपाद भक्तिवेदान्त विष्णुदैवत स्वामी बीई, एमटेक (आयआयटी, खरगपूर) (दूरध्वनी–०८२७५८४५३४४, ७५७९९२३८४५, ८२७५८४४६६७) **ई–पत्र–** vd108108108@gmail.com

या ग्रंथाच्या मराठी आवृत्तीच्या प्रकाशनासाठी खालील भक्तांनी सहाय्यता दिली. आम्ही त्यांचे आभारी आहोत—श्रीमान विलास विठ्ठल बर्वे बीए (ऑनर्स), एलएलएम (दौंड); श्रीपाद राधाशरण प्रभू (दौंड); श्री रामानुज प्रभू (रावणगाव); श्री वैकुण्ठ प्रभू (रावणगाव); श्री गोलोक प्रभू (देवळगाव) ; श्री राजाराम प्रभू (रावणगाव); श्री पांडुरंग मेरगळ (रावणगाव); श्री विजय आटोळे (रावणगाव); श्री ब्रह्महरिदास प्रभू (दौंड); श्री विष्णुपंत पाचपूते (बोरीबेल); श्री विठ्ठल पाचपूते (बोरीबेल); श्री अर्जुन कुंभार (बोरीबेल); श्री अंकुशराव येवले (गाडेवाडी); श्री प्रताप जगताप (गाडेवाडी); श्री पांडुरंग क्षीरसागर (भोसे); श्री दिलीप मोरे (खेड); श्री विश्वनाथ प्रभू; श्री कानजी भाई; श्री शांतीदास प्रभू (देवळगाव); श्री विठ्ठल कृष्ण प्रभू (देवळगाव); श्री सुदाम ठणगे (पेडगाव); श्री अमलकृष्ण प्रभू; श्री शिवाजी नाकोरे (शिंगाडेवाडी); श्री निताई प्रभू (कॅनडा).

या पुस्तकात वापरलेल्या छायाचित्रे व कलाकृतींसाठी आम्ही सर्व भक्तांचे व कलाकारांचे आभारी आहोत. श्रील भक्तिवेदान्त स्वामी महाराजांची छायाचित्रे भक्तिवेदान्त बुक ट्रस्टच्या सौजन्याने.

# प्रस्तावना

परम करुणामय आणि अहैतुकी कृपाळू आमचे गुरुपादपद्म नित्यलीला प्रविष्ट ॐ विष्णुपाद श्रीमद्भक्तिप्रज्ञान केशव गोस्वामी महाराज यांच्या प्रेरणेने प्रकाशित झालेल्या 'श्रीहरिनाम महामंत्र' नामक लहान पुस्तकाचे दहावी आवृत्ती श्रद्धाळू वाचकांसमक्ष प्रस्तुत करताना मला अपार आनंदाची अनुभूती होत आहे. मी हा ग्रंथ सहज, सरळ रूपात प्रस्तुत करण्याचा भरपूर प्रयत्न केला आहे.

कलियुगात श्रीकृष्ण-संकीर्तनच एकमात्र परमधर्माच्या रूपात निर्णीत झाले आहे. हे केवळ कोण्या विशेष वर्गाच्या व्यक्तींसाठीच नाही, परंतु सनातन अर्थात सर्व जीवात्म्यांचा अपरिवर्तनीय वास्तविक स्वभाव आहे. जी स्थान, काल आणि पात्रानुसार परिवर्तीत होते, ती वास्तवात धर्म नव्हे, उलट तिला व्यक्तिगत श्रद्धा म्हटली जाते. जरी इंग्रजी भाषेत कोणत्याही कारणाने स्वीकारल्या गेलेल्या व्यक्तिगत व्यवहारासच (आचरणास) religion म्हणून संबोधले जाते, परंतु ही गोष्ट ठीक नाही. कारण प्रायः जगात पाहिले जाते की कधी कोणी हिंदू मनुष्य मुस्लिम बनतो आणि कधी कोणी मुस्लिम मनुष्य ख्रिश्चन. हा प्रकार प्रायः जगात सर्वत्र पाहिला जातो. म्हणून निष्कर्ष हा आहे की कोण्या कारणास्तव आपली श्रद्धा एका स्थानातून हटवून कोण्या दुसऱ्या स्थानावर लावण्यास वास्तवात धर्म म्हणता येत नाही. धर्म तर त्याला म्हणतात जो कधी कोणत्याही अवस्थेत परिवर्तीत होत नाही.

संकीर्तन—सर्वांकरिता उपयोगी, सर्व स्थानांवर उपयोगी आणि सर्व परिस्थितींमध्ये सर्वकाळ पालन करण्यायोग्य धर्म आहे. जवळपास पाचशे बावीस वर्ष पूर्वी श्रीराधा-कृष्ण मिलित तनु (शरीर) श्रीगौरांग महाप्रभूंनी या संकीर्तनरूपी महान अस्त्राने धर्माचा विवाद, शास्त्राचा विवाद, संप्रदायाचा विवाद, विकर्माचा विवाद, सुनीतीचा विवाद, दुर्नीतीचा विवाद, ज्ञानाचा विवाद, योगाचा विवाद, यथेच्छाचारितेचा विवाद, जातीयवादाचा विवाद, भांडवलवादींचा विवाद, श्रमिकांचा विवाद, समस्यांचा विवाद, वर्णाचा विवाद आणि आश्रम आदींच्या विवादरूपी सर्व प्रकारच्या विवादांना दूर करून सर्वांच्या हृदयावर विजय प्राप्त केला होता.

परंतु आज विश्वात सर्वत्र उपस्थित अनेकानेक समस्यांचा साथीचा रोग प्रत्येक दिवशी जवळपास सर्वांनाच आपल्या तावडीत फसवत आहे. दररोज नव्यानव्या विवादांची निर्मिती होते आहे. समन्वयवादरूपी समाधानाच्या (निरसनाच्या) नावावर

अपसंप्रदायिकतेची समृद्धी (भरभराट) होते आहे. समाजात आजकाल चैतन्य नावाची कोणती वस्तू स्वीकारच केली जात नाही. विश्वात सर्वत्र व्यापक अशा विषम (प्रतिकूल) परिस्थितीत जर कोणती वस्तू संपूर्ण आणि सर्वांग सुंदर समाधान प्रदान करू शकते, तर ती आहे स्वयं श्रीचैतन्य महाप्रभूंद्वारे आचरित (आचरणात आणल्या गेलेले) आणि प्रचारित (प्रचार केल्या गेलेले) केवळ श्रीकृष्ण-नामसंकीर्तनरूपी महौषध. या अतिरिक्त अन्य कोणताही उपाय सार्थक होऊच शकत नाही.

सर्वाधिक प्रामाणिक आणि सर्वोच्च महानुभावांनी जागोजागी या विचारांचा सुस्पष्ट रूपात उल्लेख केला आहे. परम निर्मत्सर (मात्सर्य, ईर्षा किंवा विद्वेष हृदयात अजिबात न बाळगणारे) श्रीरूप, श्रीसनातन, भट्ट रघुनाथ, श्रीजीव, गोपाल भट्ट, दास रघुनाथ आणि श्रील वृंदावनदास ठाकूर आणि श्रीकृष्णदास कविराज गोस्वामी यांच्यासारख्या परदुःख-दुःखी (दुसऱ्यांचे दुःख पाहून दुःखी होणाऱ्या) महाजनांनी पण शास्त्रांच्या परम निगूढ (गुह्य, गुप्त) रहस्यांचे उद्‌घाटन करून श्रीमान महाप्रभुंद्वारे उच्चारित श्रीहरेकृष्ण-महामंत्राची अनेकानेक शास्त्रीय प्रमाणांच्या आधारावर सर्वोत्तमता निरूपण केली आहे.

मोठ्या सौभाग्याने कोण्या जिवास या महानुभावांच्या [महान किंवा उच्च आशय आणि विचार असणाऱ्या व्यक्तींच्या] वचनांत दृढ श्रद्धा उत्पन्न होते आणि तो सर्व समस्यांचे मूळ कारण असलेली, आपली सर्वात मोठी समस्या अर्थात भवसागराला पार करण्याकरिता आणि आपल्या स्वरूप धर्मात प्रतिष्ठित होण्यासाठी या महाजनांच्या वाणीचे अनुशीलन करतो.

परंतु दुःखाचा विषय हा आहे की आज कलीच्या [कलियुगाच्या] द्वारे प्रेरित अनेकानेक इन्द्रजालिक [मायावी] व्यक्ती अशा श्रद्धाळू, सरलचित्त (भोळयाभाबड्या) व्यक्तींच्या फसवणुकीच्या सोबतच आपल्या सर्वनाशाकरिता या नाम-संकीर्तनात पण अनेक विवाद उपस्थित करवित आहेत. कोणी म्हणत आहे की महामंत्रास “हरे कृष्ण हरे कृष्ण” पासून प्रारंभ न करून “हरे राम हरे राम पासून प्रारंभ करायला हवे. कोणी म्हणते आहे की “श्रीकृष्ण चैतन्य प्रभू नित्यानंद, हरे कृष्ण हरे राम श्रीराधे-गोविंद” हाच महामंत्र आहे. अन्य कोणी म्हणते की “निताई गौर राधे श्याम, हरे कृष्ण हरे राम” हा जपच बरोबर आहे. कोणी म्हणते आहे की महामंत्रात राम नाम भगवान श्रीरामचंद्रांस लक्ष्य करते

आहे. कोणी म्हणते आहे की हा महामंत्र मनातल्या मनात जप करण्यासाठी योग्य आहे, याचे उच्च स्वरात उच्चारण करू नये.

कलीच्या कुचक्रास [षड्यंत्र] न समजल्याने बरेचसे लोक कुचक्राचे जाळे अंथरविणाऱ्या कलीसच प्रामाणिक समजत आहेत. स्थूलदर्शी असल्याने ते स्वतः भगवंतांच्या मुखातून उच्चारित आणि प्रचारित नाम संकीर्तनरूपी अमोघ महौषधाच्या अचिंत्य प्रभावास न समजू शकल्याने स्वकपोलकल्पित विचारांद्वारे सर्वांना भ्रमित करू इच्छितात.

या सर्व इन्द्रजालिक व्यक्तींचा मूर्खपणा जगातील लोकांसमोर प्रस्तुत करण्यासाठी मी श्रीमान महाप्रभूंच्या नित्य संगी [साथी] श्रीनित्यानंद प्रभूंच्या अनुगत जनांच्या द्वारा दिल्या गेलेल्या शेकडो प्रमाणांना एकत्रित करून या छोट्याशा पुस्तकाच्या माध्यमाने प्रस्तुत करतो आहे, जेणेकरून जगतवासी [या जगातील सर्व लोक] अकृत्रिम नामसंकीर्तनरूपी चिंतामणीस प्राप्त करून लाभान्वित होतील.

श्रीमान महाप्रभूंच्या द्वारा आचरित आणि प्रचारित शुद्धा भक्तीचे भगीरथ सच्चिदानंद श्रील भक्तिविनोद ठाकुरांच्या धारेत निष्णात माझे परमाराध्य परमगुरुदेव आणि श्रील गुरुपादपद्मच श्रीकृष्ण-संकीर्तनरूपी महौषधीचे अकृत्रिम आणि अत्यधिक विश्वसनीय वितरक आहेत. त्यांच्या अशेष [संपूर्ण] कृपेने आज जरी हे महौषध शुद्ध रूपात सर्वत्र वितरित होते आहे आणि अपस्वार्थपर व्यक्तींच्या कुचेष्टा [वाईट प्रयत्न] पण प्रायः निरस्त [विफल] होत आहेत, तरी देखील ही पुस्तिका वितरित करण्याची यासाठी आवश्यकता आहे जेणेकरून कोणी अपस्वार्थपर व्यक्ती हरे कृष्ण महामंत्राच्या निर्मलतेस नष्ट करण्याचे दुःसाहस करू शकणार नाही.

साधुसंगात नामसंकीर्तनाचे अनुगमनच सनातन शिकवणीचे सार आहे. हरे कृष्ण महामंत्र श्रीराधा-कृष्ण परक मंत्र आहे. याच्या अनुशीलनाने जिवांना आपल्या वास्तविक स्वरूपाच्या अनुभूतीच्या बरोबरच श्रीराधा-कृष्ण युगुल प्रेमाची प्राप्ती होते.

या लहान पुस्तिकेचा विश्वात सर्वाधिक प्रचलित इंग्रजी भाषा आणि अन्यान्य अनेक भाषांमध्ये अनुवाद झालेला आहे, ज्याच्याद्वारे अनेक लोकांचे भले झाले आहे आणि ते शुद्ध रूपाने हरिनाम पण करित आहेत, परंतु ज्या लोकांचा दुराग्रह आहे, त्यांच्यासाठी तर स्वतः भगवान देखील काय करू शकतील?

प्रस्तुत आवृत्तीचे कंपोजिंग आणि ले-आऊट आदीसाठी श्रीमान

सुखानंद दासाधिकारी, पुत्री कांता आणि पुत्री शांती दासी यांचे सेवा-कार्य अत्यंत प्रशंसनीय आणि विशेष उल्लेखनीय आहेत. मुखपृष्ठाचे चित्र श्रीमती श्यामराणी दासीने प्रस्तुत केले आहे आणि मुखपृष्ठाचे डिझाइन (रूपरेखा) श्रीमान विकास दासाधिकारी यांनी केले आहे. श्रीश्रीगुरु-गौरांग-गांधर्विका-गिरिधारी यांच्यावर प्रचुर कृपाशीर्वादाची वृष्टी करोत—त्यांच्या श्रीचरणी हीच प्रार्थना आहे.

शेवटी भगवत्-करुणेचे घन-विग्रह परम आराध्यतम श्रील गुरुपादपद्म माझ्या प्रती प्रचुर कृपा वृष्टी करोत, ज्यामुळे त्यांच्या मनोऽभीष्ट सेवेत अधिकाधिक अधिकार प्राप्त करू शकेन—हीच त्यांच्या प्रेम प्रदानकारी श्रीचरणी सकातर प्रार्थना आहे.

शीघ्रतेने प्रकाशन झाल्यामुळे या ग्रंथात काही त्रुटी राहणे स्वाभाविक आहे. श्रद्धाळू वाचकगण त्यात संशोधन करून वाचन करतील आणि आम्हाला सूचित करतील, जेणेकरून पुढच्या आवृत्तीत आम्ही त्या त्रुटींचे संशोधन करू शकू.

| **श्रीनंदोत्सव**<br>**श्रीचैतन्याब्द ५२२**<br>**२५ ऑगस्ट, २००८ सन** | **श्रीहरि-गुरु-वैष्णव-कृपालेश-प्रार्थी**<br>**हीनदीन अकिंचन**<br>**त्रिदण्डि-भिक्षू श्रीभक्तिवेदान्त नारायण** |
|---|---|

## सुवर्ण सीतेंची इच्छापूर्ती करण्यासाठी श्रीकृष्ण-अवतार

श्रीरामचंद्रांनी एका धोब्याद्वारे सीतेच्या पावित्र्यावर संशय व्यक्त केल्यावर लोकापवादाच्या भीतीने राजाच्या मर्यादेचे पालन करताना सीतेला वनवास दिला. सीतेच्या अनुपस्थितीत जेव्हा श्रीरामांनी अश्वमेध यज्ञ करण्याचा निर्णय घेतला तेव्हा गुरू वशिष्ठांनी सांगितले की पत्नीशिवाय यज्ञ संभव नाही. यासाठी एकतर सीतेंना परत घेऊन या अथवा दुसरा विवाह करा. श्रीरामांनी दोन्ही प्रस्ताव मानण्यास असमर्थता दाखविल्यावर वशिष्ठांनी हा उपाय सुचविला की पत्नी नसेल तर पत्नीची सुवर्ण प्रतिमा बनवून तिच्या स्थानी सुवर्ण प्रतिमेस आसन दिल्यावर हा यज्ञ संपन्न केला जाऊ शकेल. श्रीरामचंद्रांनी दहा हजार वर्षांपर्यंत अनेक अश्वमेध यज्ञ आणि त्याच्या दुप्पट राजसूय यज्ञांचे अनुष्ठान केले. प्रत्येक यज्ञात सीतेंची एक-एक सुवर्ण प्रतिमा तयार केली गेली. प्रत्येक सुवर्ण सीतेंचा भगवंतांसोबत मधुर भावात रमण करण्याचा भाव होता, म्हणून त्या सर्व प्रतिमा द्वापराच्या शेवटी व्रजात गोपींच्या रूपाने जन्मल्या आणि त्यांच्या रमणाच्या इच्छापूर्तीच्या निमित्त भगवान श्रीकृष्णांनी अवतार घेतला.

# विषय-सूची



---

## भगवान श्रीकृष्णांच्या अवताराची दोन कारणे

**द्रोण आणि धरा यांना ब्रह्मदेवांनी दिलेला वर**-द्रोण नावाचे एक वसू होते आणि त्यांच्या पत्नीचे नाव होते धरा. दोघांनी ब्रह्मदेवांची आराधना केली आणि त्यांना वर मागितला—"प्रभो! जेव्हा आम्ही पृथ्वीवर जन्म घेऊ, तेव्हा आमची जगदीश्वर भगवान श्रीकृष्णांप्रती वात्सल्यमय भक्ती होवू द्यावी." ब्रह्मदेव म्हणाले—"असेच होईल". द्वापराच्या शेवटी द्रोण आणि धरा भगवान श्रीकृष्णांचे नित्य पिता-माता नंद आणि यशोदा यांच्यात एकत्रित होऊन व्रजात जन्मले. ब्रह्मदेवांच्या वरदानास सत्य करण्याकरिता श्रीकृष्ण नंद-यशोदा अथवा द्रोण-धरा यांच्या पुत्ररूपात अवतरित झाले.

**रामावतारात वानरांच्या ऋणाची परतफेड**-रामावतारात सीतेला शोधण्यासाठी आणि रावणाविरुद्ध युद्धात वानरांनी भगवान श्रीरामांची खूप मदत केली होती. साधारणतः असा नियम आहे की सेनापती आपल्या सैनिकांना कपडे, अस्त्र-शस्त्रादी, भोजन तसेच वेतन देतात परंतु भगवान श्रीराम तर त्यावेळी वनवासी होते आणि त्यांच्याजवळ काही धनही नव्हते. वानरांनी स्वतः आपले भरण-पोषण केले आणि अस्त्र-शस्त्रांची व्यवस्था देखील स्वतःच केली. त्यांच्या ह्या ऋणाची परतफेड करण्यासाठी भगवान श्रीकृष्णांनी अवतरित होवून चोरी करून पोटभर लोणी त्यांना खाऊ घातले.

## भगवान श्रीकृष्णांचे जन्म घेण्यामागे एक कारण होते पृश्नी आणि सुतपा यांची इच्छापूर्ती

स्वायंभुव मन्वंतरात सुतपा नावाचे एक प्रजापती होते आणि त्यांची पत्नी होती पृश्नी. पृश्नी आणि सुतपा यांना विवाहाच्या पश्चात ब्रह्मदेवांनी प्रजासृष्टीची आज्ञा दिली होती. ते सर्व इंद्रियांना संयमित करीत कठोर तपस्या करू लागले. पाऊस, वारा, थंडी तसेच गरमी सहन करून प्राणायामाद्वारे आपले चित्त शुद्ध केले. केवळ झाडांची पडलेली पाने आणि वायूचे सेवन करून शांतचित्ताने आपल्या अभीष्ट फळाच्या प्राप्तीसाठी भगवंताची आराधना करीत-करीत बारा हजार देव-वर्षे घालविली. त्यांच्या तपस्येने प्रसन्न होवून भगवान श्रीकृष्ण त्यांच्यासमोर प्रगट झाले आणि वर मागण्यास सांगितले. त्यांनी भगवंतांकडे त्यांच्यासारखाच विलक्षण पुत्र व्हावा असा वर मागितला. भगवान श्रीकृष्णांनी विचार केला की मी वर तर दिला आहे, परंतु मी तो पूर्ण करू शकत नाही. कारण माझ्यासारखा दुसरा कोणीच नाही. कोणाला कोणती वस्तू द्यायची प्रतिज्ञा करून ती पूर्ण करता आली नाही तर त्यासारखी तिप्पट वस्तू द्यावी लागेल. माझ्यासारखा तर केवळ मीच आहे. म्हणून मी तीन वेळा यांचा पुत्र होईल. यासाठी भगवान श्रीकृष्ण स्वयं त्यांच्या पुत्ररूपात प्रगट झाले आणि पृश्नीगर्भ नावाने प्रसिद्ध झाले. दुसऱ्या जन्मात पृश्नी आणि सुतपा अदिती आणि कश्यप नावाची दंपती झाले आणि श्रीकृष्ण त्यांचे पुत्र उपेन्द्र झाले. शरीर छोटे असल्यामुळे त्यांना वामन देखील म्हणतात. द्वापराच्या अंती तिसऱ्या जन्मात पृश्नी आणि सुतपा देवकी आणि वसुदेव झाले आणि आपण दिलेला वर पूर्ण करण्यासाठी श्रीकृष्ण देवकी आणि वसुदेवांच्या पुत्ररूपात अवतरित झाले.

---



**हरे कृष्ण**
**हरे कृष्ण**
**कृष्ण कृष्ण**
**हरे हरे**
**हरे राम**
**हरे राम**
**राम राम**
**हरे हरे**



# श्रीहरिनाम महामंत्र

**हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे।**
**हरे राम हरे राम राम राम हरे हरे॥**

वेद, उपनिषद, पुराण आणि संहिता इत्यादी सात्वत-शास्त्रांच्या अनुसार कलियुगाचा महामंत्र आणि तारक ब्रह्म नाम आहे—"हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे। हरे राम हरे राम राम राम हरे हरे ॥" या सोळा हरिनामात्मक महामंत्राचे संकीर्तन कलियुगाचा मुख्य धर्म आहे. भगवंतांचे 'नाम' साक्षात भगवत्-स्वरूपच आहे. भगवान श्रीकृष्णांनी आपल्या स्वरूपाचे पूर्ण मधुर रूप, समस्त गुण, मधुर लीला आणि कृपा इत्यादी समस्त शक्तींना या नावांत पूर्ण रूपाने भरून ठेवले आहे. जरी भगवंतांचे 'नाम' आणि भगवत्-स्वरूप (भगवंतांचे स्वरूप) 'नामी' हे सर्वथा अभिन्न आहेत, त्यांच्यात काही भेद नाही आहे, तथापि काही-काही विषयांत नामी-ब्रह्मापेक्षा नाम-ब्रह्माची कृपा अधिक सांगितली जाते. स्वयं-भगवान श्रीकृष्णच मायाबद्ध जिवांचा उद्धार करण्यासाठी आपल्या अहैतुकी कृपेने 'नामा'च्या रूपात अवतीर्ण झाले आहेत. म्हणून सौभाग्यवान जन[लोक] श्रीहरिनामपरायण सद्गुरूंच्या द्वारे श्रीहरिनाम महामंत्राची दीक्षा ग्रहण करून त्याचे संकीर्तन, संख्यापूर्वक कीर्तन, उपांशु-जप आणि स्मरण इत्यादीच्या द्वारे भगवत्-आराधना करतात. शास्त्रांच्या अनुसार कलियुगात नाम-स्मरण अथवा उपांशु-जपापेक्षा उच्च स्वराने नामसंकीर्तनाचा महिमा अधिक सांगितला आहे.

**जपतो हरिनामनि स्थाने शतगुणाधिकः।**
**आत्मानञ्च पुनात्युच्चैर्जपन् श्रोतृन् पुनाति च॥**

*(श्रीनारदीय, प्रल्हाद वाक्य)*

हरिनाम जपपरायण व्यक्तीपेक्षा उच्चस्वराने हरिनाम-कीर्तनकारी व्यक्ती शंभरपट श्रेष्ठ आहे, ही गोष्ट संपूर्ण ठीक आहे, कारण जप करणारा व्यक्ती आपल्यालाच पवित्र करते, परंतु उच्चस्वराने नाम कीर्तनकारी व्यक्ती स्वतःला आणि सोबतच श्रोत्यांना पण पवित्र करतो. पशू-पक्षी, कीटक-पतंग, वृक्ष, लता, गुल्म पर्यंत, जे बोलू शकत नाहीत, ते पण हरिनाम श्रवण करून भगसागराच्या पार जातात.

म्हणून कलिकाळात सोळा हरिनामात्मक महामंत्राचे संकीर्तनच समस्त साधनांचे शिरोमणी आहे. कलियुग-पावनावतारी श्रीचैतन्य महाप्रभूंनी सदा-सर्वदा श्री हरिनाम-संकीर्तन करण्याचा उपदेश दिला

आहे—"कीर्तनीयः सदा हरिः॥" बृहन्नारदीय पुराणात (३८/१२६) जोर देऊन सांगितले आहे—

**हरेर्नाम हरेर्नाम हरेर्नामैव केवलम्।**
**कलौ नास्तेव नास्तेव नास्तेव गतिरन्यथा॥**

हरेर्नाम श्लोकाची व्याख्या करताना श्रील कृष्णदास कविराज गोस्वामी म्हणतात—

**कलिकाले नामरूपे कृष्ण-अवतार।**
**नाम हइते हय सर्व जगत्-निस्तार॥**
**दार्ढ्य लागि' 'हरेर्नाम' उक्ति तिनबार।**
**जड़लोक बुझाइते पुनः 'एव' कार॥**
**'केवल'-शब्दे पुनरपि निश्चयकरण।**
**ज्ञान-योग-तप-आदि कर्म-निवारण॥**
**अन्यथा जे माने, तार नाहिक निस्तार।**
**नाहि, नाहि, नाहि,—तिन उक्त 'एव' कार॥**

*(चैतन्य चरितामृत आदिलीला १७/२२-२५)*

कलियुगात स्वयं-भगवान श्रीकृष्णच नामरूपात अवतरित झाले आहेत. हरिनामाद्वारेच साऱ्या जगाचा उद्धार होतो. जड़-बुद्धी असणाऱ्या लोकांच्या हरिनामात दृढतेसाठी 'हरेर्नाम' पद तीन वेळा आणि 'एव' पद वापरले गेले आहे. पुन्हा ज्ञान, योग, तप आदी कर्मांच्या परित्यागाला निश्चित करण्यासाठी 'केवल' शब्द म्हटल्या गेला आहे. जी व्यक्ती शास्त्राच्या या आदेशाची अवज्ञा करते, तिचा उद्धार कदापि संभव नाही आहे. या गोष्टीला स्पष्ट करण्यासाठी शेवटी 'नास्त्येव' पदाचा देखील तीन वेळा वापर केला गेला आहे.

## श्रीनृसिंहदेवांची अद्भुत स्तुती

**उग्रोऽप्यनुग्र एवायं स्वभक्तानां नृकेशरी।**
**केशरीव स्वपोतानामन्येषामुग्रविक्रमः॥**

येथे श्रीभगवंतांच्या करुणेचे वैशिष्ट्य निरूपित करताना श्रीमन्महाप्रभूंनी श्रीधरस्वामीकृत आणखी एक श्लोकात श्रीनृसिंहदेवांची स्तुती केली आहे. सिंह ज्या प्रकारे दुसऱ्यांच्या प्रती अत्यंत क्रूर, विक्रमशाली आणि अतिशय भयानक असूनही आपल्या संतानाच्या प्रती अनुग्रहशील आणि स्नेहशील राहतो, त्याच प्रकारे भगवान श्रीनृसिंह हिरण्यकशिपू आदी असुरांच्या प्रती उग्र असूनही प्रल्हाद आदी आपल्या भक्तांप्रती स्नेहपरायण राहातात.

# महामंत्राचा क्रम

काही लोकांचे म्हणणे आहे की महामंत्र 'हरे राम' पासून आरंभ करायला हवा. त्यांच्या युक्त्या अशा आहेत—

(१) वेंकटेश प्रेस मुंबईहून छापलेल्या कलिसंतरणोपनिषदात हा महामंत्र 'हरे राम हरे राम राम राम हरे हरे। हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे॥' असा छापला आहे.

(२) 'कल्याण' गोरखपुरमध्ये पण असाच क्रम दिसतो.

(३) त्रेतायुगामध्ये श्रीरामांचा आणि नंतर द्वापरयुगामध्ये श्रीकृष्णांचा आविर्भाव झाल्यामुळे प्रथम 'हरे राम' आणि नंतर 'हरे कृष्ण' असणेच युक्तिसंगत आहे.

वर सांगितलेल्या शंका अथवा युक्त्या संपूर्णपणे निराधार आहेत. वेंकटेश प्रेस मुंबईच्या छापलेल्या कलिसंतरणोपनिषदाच्या पूर्वीच्या आवृत्त्यांमध्ये हा महामंत्र 'हरे कृष्ण' पासूनच प्रारंभ केलेला दिसतो. कलकत्याच्या आणि जयपूरच्या जुन्या ग्रंथालयांमध्ये हे ग्रंथ अजूनही सुरक्षित आहेत.

दुसरी गोष्ट, गोरखपुर गीताप्रेस मधून प्रकाशित 'कल्याण' या विषयात प्रामाणिक आधार नाही आहे. तिसरी गोष्ट त्रेतायुग आधी आहे आणि द्वापरयुग नंतर आहे, या क्रमाचा प्रभाव या सनातन नित्य महामंत्रावर पडत नाही. हा महामंत्र युगातीत अथवा कालातीत आहे.

या विषयाला प्रत्येक युगाच्या तारक ब्रह्म-महामंत्रांच्या द्वारे समजले जाऊ शकते.

सत्ययुगाचा—

**नारायण-परावेदाः नारायण पराक्षराः।**
**नारायण परामुक्तिः नारायण परागतिः॥**

त्रेतायुगाचा—

**रामनारायणानन्त मुकुन्द मधुसूदन।**
**कृष्ण केशव कंसारे हरे वैकुण्ठ वामन॥**

द्वापरयुगाचा—

**हरे मुरारे मधुकैटभारे गोपाल गोविन्द मुकुन्द शौरे।**
**यज्ञेश नारायण कृष्ण विष्णो निराश्रयं मां जगदीश रक्ष॥**

कलियुगाचा —

**हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे।**
**हरे राम हरे राम राम राम हरे हरे॥**

## श्रीहरिनाम महामंत्र

**षोड़शैतानि नामानि द्वात्रिंशद् वर्णकानि हि।**
**कलौयुगे महामन्त्रः सम्मतोजीवतारणे॥**

*(अनन्तसंहिता)*

म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की श्रीकृष्णावताराच्या पूर्वी त्रेतायुगाच्या तारक ब्रह्म नाम–मंत्रात पण मुकुन्द, मधुसूदन, कृष्ण, केशव, कंसारि (कंसाचे शत्रू) ही कृष्णनामे पाहायला मिळतात. म्हणून प्रस्तुत महामंत्राच्या क्रमात परिवर्तन करण्यात कोणताही तर्क अथवा युक्ती उचित नाही.

अनंत–संहितेच्या या श्लोकात स्पष्ट रूपाने याचा निर्देश दिला गेला आहे की कलिसन्तरण इत्यादी उपनिषदांत, महामंत्रात “हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे। हरे राम हरे राम राम राम हरे हरे॥” हा क्रम लिहिलेला आहे.

दुसरी गोष्ट, हा महामंत्र गुरुपरंपरेत श्रीनारदांनी आपले गुरू श्रीब्रह्मदेवांकडून प्राप्त केला आहे. हा नियम श्रीब्रह्म–माध्व–गौडीय–वैष्णव परंपरेत आज पण प्रचलित आहे. इतर संप्रदायांत हा महामंत्र गुरुपरंपरेत प्राप्त होत नाही. म्हणून याचे रहस्य व क्रम इतर संप्रदायात प्राप्त होत नाही. म्हणून त्यांनी जरी या क्रमाला परिवर्तन करून ‘हरे राम’पासूनच याचा प्रारंभ केला तरी त्यात कोणतीही आश्चर्याची गोष्ट नाही आहे.

विभिन्न प्रामाणिक शास्त्रांत या महामंत्राचे स्वरूप ज्या प्रकारे निर्दिष्ट केले आहे, त्यांच्या प्रमाणांचा खाली उल्लेख केला आहे—

ज्ञानामृतसारमध्ये सांगितले आहे की—

**“शिष्यस्योदङ् मुखस्थस्य हरेर्नामानि षोडश।**
**संश्राव्यैव ततो दद्यान्मंत्रं त्रैलौक्यमंगलम्‘॥”**

उत्तरेकडे मुख करून बसलेल्या शिष्याच्या उजव्या कानात, श्रीहरींच्या ‘हरे कृष्ण’ इत्यादी सोळा नामांना प्रदान (श्रवण करवून) करूनच, गुरुदेवांनी शिष्याला, त्रैलोक्य–मंगलकारक ‘गोपालमंत्रा’ची दीक्षा द्यावी.

ब्रह्मयामल नामक ग्रंथात श्रीशिवांच्या (श्रीशंकरांच्या) वाक्यात, ‘महामंत्राचे’ स्वरूप अशा प्रकारे लिहिलेले आहे—

**“हरिं विना नास्ति किञ्चित् पापनिस्तारकं कलौ।**
**तस्माल्लोकोद्धारणार्थं हरिनाम प्रकाशयेत्॥**

**सर्वत्र मुच्यते लोको महापापात् कलौ युगे॥**

## श्रीहरिनाम महामंत्र

**हरेकृष्णपदद्वन्द्वं कृष्णेति च पदद्वयम्।**
**तथा हरेपदद्वन्द्वं हरेराम इति द्वयम्॥**
**तदन्ते च महादेवि! राम राम द्वयं वदेत्।**
**हरे हरे ततो ब्रूयाद् हरिनाम समुद्धरेत्॥**

**महामन्त्रं च कृष्णस्य सर्वपापप्रणाशकमिति॥"**

हे महादेवी! पहा, कलियुगात श्रीहरिनामाशिवाय इतर कोणतेही साधन, सरळपणे पापांपासून सुटकारा देऊ शकत नाही, म्हणून सर्वसाधारण लोकांचा उद्धार करण्यासाठी, श्रीहरिनामालाच प्रकाशित करणे आवश्यक आहे. कलियुगात 'महामंत्राचे' संकीर्तन केल्याने सर्व लोक महापातकांतून सहजच विमुक्त होऊ शकतात. 'महामंत्रा'त प्रथम 'हरे कृष्ण' 'हरे कृष्ण' ही दोन पदे म्हणावीत. त्यानंतर 'हरे राम' 'हरे राम' हे दोन पद आणि 'राम' 'राम' ही दोन पदे, तद्नंतर 'हरे' 'हरे' ही दोन पदे म्हणून, सर्वपापविनाशक श्रीकृष्णाच्या 'महामंत्राचे' संकीर्तन, उच्चारण, जप आदी करावे.

राधातंत्रात सांगितले आहे—

**"शृणु मातर्महामाये! विश्वबीजस्वरूपिणि!।**
**हरिनाम्नो महामाये! क्रमं वद सुरेश्वरि!॥"**

कोणी भक्त प्रार्थना करतो आहे की हे विश्वबीजस्वरूपिणी! सुरेश्वरी! महामाये! मातः! माझी प्रार्थना ऐका. कृपया श्रीहरिनाम 'महामंत्रा'चा क्रम मला सांगा.

देवीने त्या भक्ताला महामंत्राचा क्रम अशा प्रकारे सांगितला आहे—

**"हरे कृष्ण हरे कृष्ण  कृष्ण कृष्ण हरे हरे।**
**हरे राम हरे राम राम राम हरे हरे॥**

**द्वात्रिंशदक्षराण्येव कलौ नामानि सर्वदम्।**
**एतन्मन्त्रं सुतश्रेष्ठ! प्रथमं शृणुयान्नरः॥"**

हे पुत्रश्रेष्ठ! सर्वसिद्धिप्रद 'हरे कृष्ण हरे कृष्ण' इत्यादी सोळा नाम, बत्तीस अक्षराच्या श्रीकृष्णनामालाच कलियुगात 'महामंत्र' म्हटलेले आहे. म्हणून स्वतःचे कल्याण इच्छिणाऱ्या मनुष्याला, श्रीगुरुदेवांच्या द्वारे, प्रथम त्याचेच श्रवण करवावे.

त्याच राधातंत्रात त्रिपुरादेवींनी पण असाच निर्देश दिला आहे—

**"हरिनाम्ना विना पुत्र! दीक्षा च विफला भवेत्।**
**गुरुदेवमुखाच्छ्रुत्वा हरिनाम पराक्षरम्॥**

**ब्राह्मण-क्षत्र-विट्-शूद्राः श्रुत्वा नाम पराक्षरम्।**
**दीक्षां कुर्युः सुतश्रेष्ठ! महाविद्यासु-सुन्दर!॥"**

हे पुत्रश्रेष्ठ! तुम्ही महाविद्यांच्या ज्ञानात पारंगत आहात. पहा! गुरूच्या मुखातून 'हरे कृष्ण' इत्यादी हरिनामात्मक 'महामंत्र' श्रवण केल्याशिवाय, श्रीगोपालमंत्र इत्यादींची दीक्षा निष्फळ होते; म्हणून ब्राम्हण-क्षत्रिय इत्यादी चारी वर्णांच्या व्यक्तींना, श्रीगुरुदेवांच्या मुखातून 'महामंत्रा'ला श्रवण (ग्रहण) करूनच, श्रीगोपालमंत्र आदी मंत्रांची दीक्षा ग्रहण करायला हवी.

पद्मपुराणात पण सांगितले आहे की—

**"द्वात्रिंशदक्षरं मन्त्रं नामषोडशकान्वितम्।**
**प्रजपन् वैष्णवो नित्यं राधाकृष्णस्थलं लभेत्॥"**

सोळा नामांनी युक्त बत्तीस अक्षराच्या 'हरे कृष्ण' इत्यादी 'महामंत्राचा' नित्य जप करणारे वैष्णव, श्रीराधाकृष्णांच्या गोलोक-वृन्दावनधामाला प्राप्त करतात.

पहा, ब्रह्माण्डपुराणाच्या राधाहृदयखण्डात, श्रीवेदव्यासांच्या प्रती रोमहर्षणसूतांची प्रार्थना अशी आहे—

**"यत्वया कीर्तितं नाथ! हरिनामेति संज्ञितम्।**
**मन्त्रं ब्रह्मपदं सिद्धिकरं तद् वद नो विभो!॥"**

हे विभो! हे प्रभो! आपण श्रीहरिनामात्मक ब्रह्मस्वरूप व सिद्धिप्रद जो मंत्र सांगितला आहे, त्याच्या स्वरूपाबद्दल मला उपदेश द्या.

याच्या उत्तरात श्रीवेदव्यासांनी अशा प्रकारे उपदेश दिला —

**"ग्रहणाद् यस्य मन्त्रस्य देही ब्रह्ममयो भवेत्।**
**सद्यः पूतः सुरापोऽपि सर्वसिद्धियुतो भवेत्।**
**तदहं तेऽभिधास्यामि महाभागवतो ह्यसि॥**

**हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे।**
**हरे राम हरे राम राम राम हरे हरे॥**

**इति षोडशकं नाम्नां त्रिकालकल्मषापहम् ।**
**नातः परतरोपायः सर्ववेदेषु विद्यते॥"**

पहा पुत्रा! जो मंत्र ग्रहण केल्याने देहधारी प्राणी ब्रह्ममय होऊन जातो, आणि मद्यपान करणारी व्यक्तीपण तत्काळ पवित्र होऊन सर्व सिद्धींद्वारे युक्त होऊन जाते, त्या महामंत्राचा उपदेश मी

तुम्हाला अवश्य प्रदान करीन; कारण तुम्ही योग्यपात्र महाभागवत आहात. पहा! ' हरे कृष्ण' इत्यादी सोळा नामांचा 'महामंत्र', त्रैकालिक-पापांना विनष्ट करणारा आहे. चारी वेदांमध्ये हा 'महामंत्र' सोडून, संसारातून पार होण्यासाठी, कोणताही श्रेष्ठ उपाय सांगितला नाही आहे.

अनन्त-संहितेत पण सांगितले आहे की—

**"हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे**
**हरे राम हरे राम राम राम हरे हरे**

**षोडशैतानि नामानि द्वात्रिंशद्वर्णकानि हि।**
**कलौ युगे महामन्त्रः सम्मतो जीवतारणे॥**
**उत्सृज्यैतन्महामन्त्रं ये त्वन्यत् कल्पितं पदम्।**
**महानामेति गायन्ति ते शास्त्रगुरुलङ्घिनः॥"**

'हरे कृष्ण हरे कृष्ण' इत्यादी बत्तीस वर्णांचे सोळा नामच, कलियुगात जिवांच्या उद्धारासाठी सर्वलोकशास्त्रसम्मत 'महामंत्रा'च्या नावाने विख्यात आहे. म्हणून जे लोक या 'महामंत्रा'ला सोडून, आपल्या अथवा दुसऱ्यांच्या द्वारे कल्पित कोण्या दुसऱ्या पदाला (अर्थात, निताई गौर राधे श्याम, हरे कृष्ण हरे राम अथवा श्रीकृष्ण चैतन्य प्रभू नित्यानन्द, हरे कृष्ण हरे राम श्रीराधे गोविन्द आदींना) महामंत्राच्या नावाने कीर्तन करतात, ते लोक शास्त्र आणि गुरुजनांचे उल्लंघन करणारे आहेत. जर कोणी विचारेल की 'हरे कृष्ण' इत्यादी सोळा नामांच्या मंत्रालाच 'महामंत्र' का म्हणतात, तर याचे उत्तर हे आहे की भगवान श्रीकृष्णांच्या समस्त नामांत 'हरी' या नामाच्या समान आसन्न पाप, संकट, अविद्या इत्यादींना हरण करणारे, 'कृष्ण'—नामाच्या समान प्रेम देणारे आणि 'राम' नामाच्या समान मुक्तिदाता (भव-तारक) दुसरे नाम नाही आहे. या महामंत्रात या तीन मुख्य नामांचा समावेश आहे. दुसरी गोष्ट ही आहे की ही सोळा नावे संबोधनात्मक आहेत, त्यांत नमः, ॐ, क्लीं, स्वाहा इत्यादी पदांचा समावेश नसल्याने त्याला महामंत्र म्हणतात.

सनत्कुमार-संहितेत पण सांगितले आहे की—

**"हरे कृष्णौ द्विरावृत्तौ कृष्ण तादृक् तथा हरे।**
**हरे राम तथा राम तथा तादृक् हरे पुनः॥**

**हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे।**

**हरे राम हरे राम राम राम हरे हरे॥"**

अर्थात प्रथम 'हरे कृष्ण' दोन वेळा, पुन्हा 'कृष्ण' दोन वेळा, त्यानंतर 'हरे' दोन वेळा म्हणावे; त्यानंतर 'हरे राम' दोन वेळा, पुन्हा 'राम' दोन वेळा आणि त्यानंतर 'हरे' दोन वेळा म्हणावे. असे केल्याने महामंत्र झाला—हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे। हरे राम हरे राम राम राम हरे हरे॥

पहा यजुर्वेदीय–कलिसन्तरणोपनिषदात पण 'महामंत्रा'चे स्वरूप आणि माहात्म्य अशा प्रकारे सांगितले आहे—

**"हरिः ॐ॥ द्वापरान्ते नारदो ब्रह्माणं जगाम, कथं भगवन्! गां पर्यटन् कलिं सन्तरेयमिति। स होवाच ब्रह्मा साधु पृष्टोऽस्मि सर्वश्रुतिरहस्यं गोप्यं तच्छ्रुणु येन कलिसंसारं तरिष्यसि। भगवत आदिपुरुषस्य नारायणस्य नामोच्चारणमात्रेण निर्धूतकलिर्भवति। नारदः पुनः पप्रच्छ। तन्नाम किमिति? स होवाच हिरण्यगर्भः—"हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे। हरे राम हरे राम राम राम हरे हरे॥" इति षोडशकं नाम्नां कलिकल्मषनाशनम्। नातः परतरोपायः सर्ववेदेषु दृश्यते॥ इति षोडशकलावृतस्य जीवस्य आवरणविनाशनम्। ततः प्रकाशते परंब्रह्म मेघापाये रविरश्मिमण्डलीवेति। पुनर्नारदः पप्रच्छ। भगवन्! कोऽस्य विधिरिति? स होवाच नास्य विधिरिति। सर्वदा शुचिरशुचिर्वा पठन् ब्रह्मणः सलोकतां समीपतां सरूपतां सायुज्यतामेति।"**

द्वापर–युगाच्या शेवटी नारद मुनी श्रीब्रह्मदेवांच्या निकट गेले आणि प्रणाम करून म्हणाले की भगवन्! भूतलावर भ्रमण करित मी कलिकाळाला कसा पार करू शकेन?

श्रीब्रह्मदेव म्हणाले—हे पुत्र! तुम्ही फार छान प्रश्न केला. सर्व वेदांचे गोपनीय रहस्य आहे त्याला ऐकावे, ज्याच्या द्वारे तुम्ही कलिरूप–संसारातून अनायासच पार होऊ शकाल. आदिपुरुष भगवान श्रीमान नारायणांच्या (कृष्णांच्या) नामोच्चारणानेच, कलियुग विशेष रूपाने (थरथर) कापायला लागते.

नारदांनी परत विचारले की ते नाव कोणते? त्याचे स्वरूप काय?

याच्या उत्तरात ब्रह्मदेव म्हणाले की—"हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे। हरे राम हरे राम राम राम हरे हरे॥" अशा प्रकारे सोळा नावांचा हा जो 'महामंत्र' आहे, तो कलियुगाच्या कल्मषांना संपूर्ण रूपाने विनष्ट करणारा आहे. सर्व वेदांमध्ये याच्यापेक्षा श्रेष्ठ इतर कोणतेही साधन दिसत नाही. हा मंत्र षोडश–

कलांद्वारे आवृत अर्थात पंचभूत आणि अकरा इंद्रियांच्या आवरणांनी युक्त जिवाच्या आवरणाला विनष्ट करणारा आहे. त्या पश्चात तर जिवाच्या समोर परब्रह्म अशा प्रकारे प्रकाशित करतो, जसे ढग विनष्ट झाल्यानंतर सूर्याच्या किरणांचा समुदाय प्रकाशित होतो.

श्रीनारदांनी परत विचारले की भगवन्! या 'महामंत्रा'च्या जपाचा काय विधी आहे? ब्रह्मदेव म्हणाले—याच्या जपाची कोणताही विधी नाही आहे. पवित्र अथवा अपवित्र कोणत्याही अवस्थेत कोणतीही व्यक्ती, या 'महामंत्रा'चे स्पष्ट उच्चारण करित, ब्रह्माची सलोकता–समीपता–सरूपता आणि सायुज्यतेला आनुषंगिक रूपाने प्राप्त करू शकते.

केवळ इतकेच नाही; परंतु मुख्य रूपाने तर पंचम पुरुषार्थ —श्रीकृष्णप्रेमापर्यंत प्राप्त करू शकते.

(या विषयात श्रीचैतन्यचरितामृत आदिलीला ७/८३–८६; मध्यलीला २५/१४७, १९२; अंत्यलीला ३/१७७; अंत्यलीला ७/१०४; अंत्यलीला २०/११ पण द्रष्टव्य आहेत.)

श्रीभक्तिचन्द्रिकेच्या सप्तम पटलात सांगितले आहे की –

**अथ मन्त्रवरं वक्ष्ये द्वात्रिंशदक्षराऽन्वितम्।**
**सर्वपापप्रशमनं सर्वदुर्वासनाऽनलम्॥**

हा 'महामंत्र' बत्तीस अक्षरांनी युक्त आहे; समस्त पापांचा नाशक आहे, सर्व प्रकारच्या दुर्वासनांना जाळण्यासाठी अग्निस्वरूप आहे.

**चतुर्वर्गप्रदं सौम्यं भक्तिदं प्रेमपूर्वकम्।**
**दुर्बुद्धिहरणं शुद्धसत्त्वबुद्धिप्रदायकम्॥**

धर्म–अर्थ–काम–मोक्ष देणारा आहे, सुंदर स्वरूपाचा आहे, प्रेमलक्षणाभक्ती देणारा आहे, दुर्बुद्धीचे हरण करणारा आहे, शुद्धसत्त्वरूप भगवद्–वृत्तियुक्त बुद्धी देणारा आहे,

**सर्वाराध्यं सर्वसेव्यं सर्वेषां कामपूरकम्।**
**सर्वाधिकारसंयुक्तं सर्वलोकैकबान्धवम्॥**

सर्वांचा आराधनीय आणि सेवनीय आहे, सर्वांची कामना पूर्ण करणारा आहे, सर्वांच्या अधिकारांनी युक्त आहे, अर्थात 'महामंत्रा'च्या संकीर्तनात सर्वांना अधिकार आहे; हा महामंत्र, सर्वांचा मुख्य बांधव आहे.

**सर्वाकर्षणसंयुक्तं दुष्टव्याधिविनाशनम्।**
**दीक्षाविधिविहीनं च कालाकालविवर्जितम्।**

सर्वांना आकर्षण करण्याच्या शक्तीने युक्त आहे, दुष्टव्याधींचा विनाशक आहे, दीक्षा विधी आदीच्या अपेक्षेपासून रहित आहे,

वेळेच्या प्रतिबंधाने रहित आहे.

**वाङ्मात्रेणार्चितं बाह्यपूजाविध्यनपेक्षकम्।**
**जिह्वास्पर्शनमात्रेण सर्वेषां फलदायकम्।**
**देशकालाऽनियमितं सर्ववादिसुसम्मतम्॥१॥**

केवळ वाणीद्वारे पूजित होण्यायोग्य आहे, बाह्य पूजा विधीची अपेक्षा करित नाही, सर्वांना केवळ जिभेच्या स्पर्शमात्रानेच फलदायक आहे, देश-काल इत्यादी नियमांपासून विमुक्त आहे, म्हणून सर्ववादीजनांद्वारे सुसम्मत आहे.॥१॥

आणि पहा, अथर्व वेदाच्या पिप्पलाद-शाखेत सांगितले आहे की —

**स्वनाम-मूलमन्त्रेण सर्वं ह्लादयति विभुः,**
**स एव मूलमन्त्रं जपति हरिरिति कृष्ण इति राम इति।**

सर्वावतारी प्रभू श्रीकृष्ण आपल्या नामरूप-मूलमंत्राच्या द्वारे सर्वांना आल्हादित करीत असतात, आणि तेच श्रीकृष्णचैतन्य महाप्रभूंच्या रूपात 'हरे कृष्ण' इत्यादी स्वरूप असलेल्या मूळ महामंत्राचे स्पष्ट उच्चारण करत असतात. महामंत्रांच्या कीर्तनाचे फळ या प्रकारे सांगितले गेले आहे—

**मन्त्रो गुह्यः परमो भक्तिवेद्यः नामान्यष्टावष्ट च शोभनानि।**
**तानि नित्यं ये जपन्ति धीरास्ते वै मायामतितरन्ति नान्ये॥**

**परमं मन्त्रं परमरहस्यं नित्यमावर्तयति।**

'महामंत्र' परमगुह्य आहे आणि भक्तीच्या द्वारेच जाणल्या जाऊ शकतो. त्यामध्ये 'हरे कृष्ण' इत्यादी आणि 'हरे राम' इत्यादी परम मनोहर आठ-आठ नाव आहेत, म्हणून जी बुद्धिमान व्यक्ती या नामांचा नित्य जप करते, ती मायेतून अवश्यच विमुक्त होईल, दुसरे नाही. म्हणून बुद्धिमान पुरुष 'महामंत्रा'चे कीर्तन, स्मरण आणि जप सदा-सर्वदा करतात.

ब्रह्मांडपुराण उत्तर-खंडात सहाव्या अध्यायात याचा उल्लेख केला गेला आहे की वृषभानू राजांनी क्रतू मुनींपुढे प्रार्थना केली की हे भगवन्! जर माझ्यावर आपला अनुग्रह असेल, तर मला हरींच्या नामांचे दान करावे. त्यावेळी महात्मा क्रतू मुनींनी त्यांना 'हरे कृष्ण' इत्यादी सोळा नावे प्रदान केले. म्हणून बुद्धिमान व्यक्तीला या 'महामंत्रा'चे संकीर्तन, सदा-सर्वदा करायला हवे —"नामसङ्कीर्तनं तस्मात् सदा कार्यं विपश्चिता।"

# श्री चैतन्य महाप्रभू आणि महामंत्र

श्रीहरिनाम-संकीर्तनाचे प्रवर्तक श्रीचैतन्य महाप्रभूंनी पण भक्तांना 'महामंत्रा'च्या संकीर्तनाचा उपदेश दिला आहे. श्रीवासुदेव-सार्वभौम भट्टाचार्य यांनी पण म्हटले आहे की—

**विषण्णचित्तान् कलिघोरभीतान्, संवीक्ष्य गौरो हरिनाममन्त्रम्।**
**स्वयं ददौ भक्तजनान् समादिशत्, सङ्कीर्तयध्वं ननु नृत्यवाद्यैः॥**

श्री चैतन्य महाप्रभूंनी कलिकाळापासून विशेष भयभीत आणि दुःखी चित्त असलेल्या जिवांना पाहून, कृपापूर्वक स्वतः 'महामंत्रा'चे दान केले आणि भक्तजनांच्या प्रती आदेश दिला की, अहो भक्तांनो! तुम्ही सर्व मिळून, नृत्य-वाद्य इत्यादी सहित, संकीर्तन करा.

**"हरेर्नामप्रसादेन निस्तरेत् पातकी जनः।**
**उपदेष्टा स्वयं कृष्णचैतन्यो जगदीश्वरः॥**
**कृष्णचैतन्यदेवेन हरिनाम प्रकाशितम्।**
**येन केनापि तत्प्राप्तं धन्योऽसौ लोक-पावनः॥"**

श्रीहरिनामाच्या कृपेने, पापीजनांचा पण उद्धार होऊन जातो, कारण श्रीहरिनामाचे उपदेशक जगदीश्वर स्वतः श्रीकृष्णचैतन्य महाप्रभू आहेत. म्हणून श्रीकृष्णचैतन्यदेवांद्वारे प्रकाशित हरिनाम ज्या कोण्या व्यक्तीला प्राप्त झाले, ती व्यक्ती धन्य आहे आणि आपल्या संगतीने इतर लोकांना पण पवित्र करणारी बनते.

श्रीचैतन्यचरितमहाकाव्य (११/५४) मध्ये महाकवी श्रीकर्णपूरांनी सांगितले आहे—

**"ततः श्रीगौराङ्गः समवददतीव प्रमुदितो**
**हरेकृष्णेत्युच्चैर्वद मुहुरिति श्रीमयतनुः।**

**ततोऽसौ तत् प्रोच्य प्रतिवलितरोमाञ्चललितो**
**रुदंस्तत्तत् कर्मारभत बहुदुःखैर्विदलितः॥"**

(श्रीचैतन्य महाप्रभूंच्या संन्यास-ग्रहण समयी, न्हावी हातात वस्तरा घेऊन अत्यंत दुःखाने रडत-रडत विव्हळ झाला आणि श्रीचैतन्य महाप्रभूंच्या कुरळया केसांचे मुंडण करू शकला नाही), तेंव्हा श्रीराधाभाव-विभावित-विग्रहस्वरूप श्रीचैतन्य महाप्रभू अत्यंत प्रसन्न होऊन म्हणाले की हे नापित (न्हावी)! तुम्ही उच्चस्वराने वारंवार "हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे। हरे राम हरे राम राम राम हरे हरे॥"—या महामंत्राचे कीर्तन करा. श्रीमन् महाप्रभूंचा

निर्देश मिळाल्यावर तो न्हावी मंत्रमुग्ध होऊन महामंत्राचे कीर्तन करीत रोमांचित आणि पुलकित होऊन महान दुःखाने व्याकूळ होऊन देखील रडत-रडत त्यांचे मुंडण करणे आरंभ केले.

श्रीचैतन्य-मंगल ग्रंथात पाहिले जाते—

**"बाहु प्रसारिया प्रभु ब्राह्मणे तुलिला।**
**तार घरे भक्तिभरे गान आरंभिला॥**

आपल्या हातांना पसरवून प्रभूंनी ब्राह्मणास उठवले तथा त्याच्या घरात भक्तिपूर्वक गाणे आरंभ केले.

**ब्राह्मणेर घर येन हैल वृन्दावन।**
**हरिनाम शुनिबारे आइसे सर्वजन॥**

असे वाटले, जसे की ब्राह्मणाचे घर वृंदावन बनले आहे. हरिनाम श्रवण करण्यासाठी बऱ्याच व्यक्ती एकत्रित झाल्या.

**हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे।**
**हरे राम हरे राम राम राम हरे हरे॥"**

ते सगळे मिळून उपरोक्त 'महामंत्रा'चे कीर्तन करू लागले.

**"'हरे कृष्ण' नाम प्रभु बोले निरन्तर'।**

श्रीमान महाप्रभू निरंतर 'हरे कृष्ण' नामाचे उच्चारण करतात.

**प्रसन्न श्रीमुखे हरे कृष्ण कृष्ण बलि।**
**विजय हइला गौरचन्द्र कुतूहली।**

प्रसन्न श्रीमुखाने हरे कृष्ण, कृष्ण बोलून कौतुहली(कौतुकी) श्रीगौरचंद्रांचा विजय झाला.

**हरे कृष्ण हरे कृष्ण बलि' प्रेम-सुखे।**
**प्रत्यक्ष हैला आसि' अद्वैत-सम्मुखे॥"**

'हरे कृष्ण हरे कृष्ण' बोलत-बोलत प्रेम सुखात निमग्न होऊन श्रीमान महाप्रभू श्रीअद्वैताचार्यांच्या सन्मुख येऊन उपस्थित झाले.

श्रीचैतन्यभागवतातही म्हटले गेले आहे की—

**"जय जय 'हरे कृष्ण'-मन्त्रेर प्रकाश।**
**जय जय निजभक्तिग्रहण-विलास॥"**

*(मध्य ६.११७)*

'हरे कृष्ण' मंत्राच्या प्रकाशाचा जय होवो. (भगवंतांच्या द्वारे भक्त-भाव स्वीकार केल्यानंतर) आपली भक्ती ग्रहण करून केल्या जाणाऱ्या विलासाचा जय होवो, जय होवो.

**"प्रभु बले, — "कृष्णभक्ति हउक सबार।**
**कृष्णनाम-गुण वइ ना बलिह आर॥**

श्रीमान महाप्रभूंनी सांगितले—सर्वांना कृष्णभक्तीची प्राप्ती होवो.

**श्रीहरिनाम महामंत्र**

श्रीकृष्णाच्या नाम आणि गुणाच्या व्यतिरिक्त आणखी काहीच बोलू नका.

**आपने सबारे प्रभु करे उपदेशे।**
**"कृष्णनाम महामंत्र शुनह हरिषे॥**

स्वयं श्रीमान महाप्रभू सर्वांना उपदेश देत म्हणू लागले—तुम्ही सर्व कृष्णनामरूपी महामंत्राचे आनंदित होऊन श्रवण करा.

**हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे।**
**हरे राम हरे राम राम राम हरे हरे॥**

**प्रभु बले, "कहिलाङ एइ महामंत्र।**
**इहा जप गिया सबे करिया निर्बन्ध॥**

श्रीमान महाप्रभू म्हणाले—मी तुम्हाला सर्वांना हा महामंत्र ऐकविला आहे. तुम्ही सर्व याची निर्धारित (ठरावीक) संख्या ठेऊन जप करा.

**इहा हैते सर्वसिद्धि हइबे सबार।**
**सर्वक्षण बल इथे विधि नाहि आर॥"**

*(मध्य २३/७४-७८)*

याद्वारे सर्वांची सर्व प्रकारची सिद्धी होईल. सर्व समय याचे उच्चारण करा. याच्या व्यतिरिक्त आणखी कोणताही विधि-विधान नाही आहे.

**"कि शयने कि भोजने किबा जागरणे।**
**अहर्निश चिन्त कृष्ण बलह वदने॥"**

*(मध्य २८/२८)*

झोपताना, भोजन करताना तथा जागरण समयी—सर्व काळी कृष्णांचे स्मरण करा आणि मुखाने त्यांचे नाम उच्चारण करा.

**"सर्वदा श्रीमुखे 'हरे कृष्ण हरे हरे।**
**बलिते आनन्दधारा निरवधि झरे॥"**

*(अंत्य १/१९९)*

सदैव श्रीमुखाने 'हरे कृष्ण हरे हरे' बोलत श्रीमान महाप्रभूंच्या नेत्रांतून निरंतर आनंदाश्रू प्रवाहित होत होते.

**"कलियुग-धर्म हय नामसङ्कीर्तन।**
**चारियुगे चारि-धर्म जीवेर कारण॥**

*(आदी १४/१३७)*

कलियुगाचा धर्म नाम संकीर्तन आहे. चारी युगांत चार प्रकारचे धर्म जिवांच्या कल्याणासाठीच आहेत.

## श्रीहरिनाम महामंत्र

**अतएव कलियुगे नामयज्ञ सार।**
**आर कौन धर्म कैले नाहि हय पार॥**

म्हणून कलियुगात नाम यज्ञच सार आहे. अन्य कोणत्याही धर्माचे पालन केल्याने कोणीही भवसागर पार करू शकणार नाही.

**रात्रिदिन नाम लय खाइते शुइते।**
**ताँहार महिमा वेदे नाहि पारे दिते॥**

जी व्यक्ती खाताना-झोपताना, रात्रंदिवस भगवंतांच्या नामाचे उच्चारण करते, (वेद पण ठीक रितीने) तिच्या महिमेच्या विषयात सांगू शकत नाहीत.

**शुन मिश्र, कलियुगे नाहि तप यज्ञ।**
**येइ जन भजे कृष्ण, ताँर महाभाग्य॥**

हे तपन मिश्र! ऐका, कलियुगात तप आणि यज्ञ आदींचे काही विशेष फळ नाही आहे. जी व्यक्ती भगवान श्रीकृष्णांचे भजन करतो, ती महाभाग्यशाली आहे.

**अतएव गृहे तुमि कृष्ण भज गिया।**
**कुटिनाटि परिहरि एकान्त हइया॥**

म्हणून तुम्ही आपल्या घर जाऊन कृष्णांचे भजन करा आणि कुटि-नाटीचा परित्याग करून साधुसंग करा.

**साध्य-साधनतत्त्व ये किछु सकल।**
**हरिनामसङ्कीर्तने मिलिबे सकल॥**

*(आदी १४/१३९-१४३)*

साध्य-साधन तत्त्व आदी जे काही पण आहे, हरिनाम-संकीर्तनानेच तुम्हाला प्राप्त होईल.

**हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे।**
**हरे राम हरे राम राम राम हरे हरे॥**
**एइ श्लोक नाम बलि' लय महामंत्र।**
**षोल-नाम बत्तिश अक्षर एइ तंत्र॥**

या श्लोकाचा विषय जे बत्तीस-अक्षरात्मक सोळा नाम आहेत, ते सर्व संबोधनाचे पद आहे—यालाच महामंत्र म्हणतात.

**साधिते साधिते यबे प्रेमांकुर हबे।**
**साध्य-साधनतत्त्व जानिबा से तबे॥**

*(आदी १४/१४५-१४७)*

नाम करताकरता जेव्हा प्रेमाचा अंकुर निघेल, तेव्हा तुम्ही साध्य आणि साधन तत्त्व विषयासंबंधी जाणाल.

श्रीचैतन्यचरितामृतामध्ये पण म्हटले आहे की—

**श्रीहरिनाम महामंत्र**

**“कृष्णनाम–महामन्त्रेर एइ त’ स्वभाव।**
**येइ जपे, तार कृष्णे उपजये भाव॥**

कृष्ण नाम महामंत्राचा हाच स्वभाव आहे की जो पण याचा जप करतो, त्याच्या हृदयात श्रीकृष्णांच्या प्रती भाव उत्पन्न होतो.

**कृष्णविषयक प्रेमा–परम पुरुषार्थ।**
**यार आगे तृणतुल्य चारि पुरुषार्थ॥**

कृष्ण विषयक प्रेमच परम पुरुषार्थ आहे, ज्याच्या समोर अन्य चारी पुरुषार्थ तृणाच्या समान आहेत.

**पञ्चम पुरुषार्थ–प्रेमानन्दामृतसिन्धु।**
**ब्रह्मादि आनन्द यार नहे एक बिन्दु॥**

पञ्चम पुरुषार्थ (कृष्णप्रेम) प्रेमानन्दरूपी अमृताचा समुद्र आहे. ब्रह्म आदीचा आनंद ज्याच्या एक थेंबासारखा पण नाही आहे.

**कृष्णनामेर फल—‘प्रेमा’ सर्वशास्त्रे कय।”**

*(आदी ७/८३.८६)*

सर्व शास्त्र हेच सांगतात की कृष्ण नामाचे फळ ‘प्रेम’ आहे.

**“कलिकाले नामरूपे कृष्ण–अवतार।**
**नाम हैते हय सर्वजगत्–निस्तार॥”**

*(आदी १७/२२)*

कलियुगात श्रीकृष्ण नामाच्या रूपात अवतरित झाले आहेत. नामानेच संपूर्ण जगाचा उद्धार होतो.

**“कलिकाले धर्म–कृष्णनामसङ्कीर्तन॥”**

कलियुगाचा धर्म कृष्णनाम–संकीर्तनच आहे.

**सङ्कीर्तनयज्ञे ताँरे करे आराधन।**
**से त’ सुमेधा आर–कलिहतजन॥”**

*(मध्य ११/९८–९९)*

जी व्यक्ती संकीर्तन यज्ञाद्वारे भगवंतांची आराधना करते, तीच अत्यंत बुद्धिमान आहे, तिच्या व्यतिरिक्त आणखी सर्व कलीच्या द्वारे हत (ठार मारलेली)) बुद्धी असणारे आहेत.

**“निरन्तर कर कृष्णनामसङ्कीर्तन।**
**हेलाय ‘मुक्ति’ पाबे, पाबे प्रेम–धन॥”**

*(मध्य २५/१४७)*

निरन्तर श्रीकृष्णनाम–संकीर्तन करा. ‘हेला’ अर्थात नामाभासानेच ‘मुक्ती’ प्राप्त होईल आणि शुद्ध–नामाने प्रेमधनाची प्राप्ती होईल.

**“एक ‘नामाभासे’ तोमार पाप–दोष याबे।**
**आर ‘नाम’ लइते कृष्णचरण पाइबे॥”**

*(मध्य २५/१९२)*

एक 'नामाभासा'नेच तुमचे पाप-दोष आदी चालले जातील आणि (शुद्ध) 'नाम' घेतल्यानेच श्रीकृष्ण चरणकमलाची प्राप्ती होऊन जाईल.

**"नामेर फले कृष्ण-पदे प्रेम उपजय॥"**

*(अंत्य ३/१७७, ७/१०४)*

नामाच्या फलस्वरूप श्रीकृष्णांच्या चरणकमळांच्या प्रती प्रेम उत्पन्न होते.

**"कलिकालेर धर्मकृष्ण-नाम-संकीर्तन"**

*(अंत्य ७/११)*

कलियुगाचा धर्म कृष्णनाम-संकीर्तनच आहे.

**"हर्षे प्रभु कहेन,—शुन स्वरूप-राम-राय।**
**नामसङ्कीर्तन-कलौ परम उपाय॥**

प्रसन्नतापूर्वक श्रीमान महाप्रभू म्हणाले—हे स्वरूप दामोदर! हे रामानन्द राय! ऐका! कलियुगात नामसंकीर्तनच परम उपाय आहे.

**सङ्कीर्तनयज्ञे कलौ कृष्ण-आराधन।**
**सेइ त' सुमेधा पाय कृष्णेर चरण॥"**

*(अंत्य २०/८-९)*

कलियुगात कृष्णांची आराधना संकीर्तन यज्ञाद्वारेच होते. (आणि जी) सुबुद्धिमान व्यक्ती असे करते, तीच श्रीकृष्णांच्या चरणकमळांना प्राप्त करते.

**"नामसंङ्कीर्तने हैते सर्वानर्थ-नाश।**
**सर्वशुभोदय कृष्णे प्रेमेर उल्लास॥"**

*(अंत्य २०/११)*

नामसंकीर्त्तन केल्याने सर्व प्रकारच्या अनर्थांचा नाश होऊन जातो आणि श्रीकृष्णांच्या प्रेमामुळे उल्लासरूपी समस्त शुभ उदित होऊन जाते.

**"खाइते शुइते यथा तथा नाम लय।**
**काल, देश, नियम नाहि सर्वसिद्धि हय॥"**

*(अंत्य २०/१८)*

असे करण्यासाठी कोण्या काळ, देश आदीचा नियम नाही आहे. खाता-खाता, झोपून, उठबस करताना, जेथे-तेथे सदैव जो कृष्णनामाचे उच्चारण करतो, त्याला या द्वारेच सर्व प्रकारची सिद्धी प्राप्त करता येते.

**श्रीहरिनाम महामंत्र**

**“एइमत हञा येइ कृष्णनाम लय।**
**श्रीकृष्णचरणे ताँर प्रेम उपजय॥”**

*(अंत्य २०/२६)*

अशा प्रकारे जो कृष्णनाम ग्रहण करतो, त्याचे श्रीकृष्णांच्या चरणकमळांत प्रेम उत्पन्न होते.

श्रीरघुनाथदास गोस्वामींनी देखील श्रीहरिनाम महामंत्राच्या व्याख्येच्या प्रारंभात लिहिले आहे—

**“एकदा कृष्णविरहाद् ध्यायन्ती प्रियसङ्गमम्।**
**मनोबाष्पनिरासार्थं जल्पतीदं मुहुर्मुहुः॥**

**हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे।**
**हरे राम हरे राम राम राम हरे हरे॥**

**यानि नामानि विरहे जजाप वार्षभानवी।**
**तान्येव तद्भावयुक्तो गौरचन्द्रो जजाप ह॥**

एकदा, श्रीकृष्णाच्या विरहात व्याकूळ झालेली श्री राधिका, आपल्या प्रियतम श्यामसुंदरांच्या मिलनावर ध्यान करित, आपला विरहाग्नी दूर करण्यासाठी “हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे। हरे राम हरे राम राम राम हरे हरे॥” या ‘महामंत्रा’चा जप करू लागली. श्रीकृष्णांच्या विरहात श्रीमती राधिकेने, श्रीकृष्णांच्या ज्या नामांचा जप केला, श्रीराधाभावविभावित श्रीचैतन्य महाप्रभूंनी पण त्याच नावांचा जप केला.

**श्रीचैतन्यमुखोद्गीर्णा हरे कृष्णेति वर्णकाः।**
**मज्जयन्तो जगत् प्रेम्णि विजयन्तां तदाह्वयाः॥”**

*(लघुभागवतामृत १/४)*

म्हणून श्रीचैतन्य महाप्रभूंच्या श्रीमुखातून निघालेला श्रीकृष्णांचा सोळा नामात्मक आणि बत्तीस अक्षरात्मक श्रीहरिनाम महामंत्र, विश्वाला कृष्णप्रेमात निमग्न करून सर्वोपरि विराजमान राहो; त्याचा जय होवो, जय होवो.

# महामंत्राच्या व्याख्या

**'हरिः' 'कृष्णः' 'राम' इति नामत्रयात्मको 'महामन्त्रः'।**
**तस्मिन् संबोधनात्मकानि त्रीणि नामानि सन्ति।**
**तत्र त्रयाणाम्**

## माधुर्यमयी व्याख्या—

महामंत्र हरी, कृष्ण आणि राम—या तीन नावांनी युक्त आहे. त्यात संबोधनात्मक तीन नामे आहेत. या तीन नामांची माधुर्यमयी व्याख्या अशा प्रकारे आहे–

**विज्ञाप्य भगवत्तत्त्वं चिद्घनानन्दविग्रहम्।**
**हरत्यविद्यां तत्कार्यमतो हरिरिति स्मृतः॥**

सच्चिदानन्द–विग्रह असणारे भगवान आपल्या तत्त्वाला ठीक समजावून, जिवाची अविद्या आणि त्या अविद्येचे कार्य अज्ञानाला हरण करित असतात; म्हणून ते 'हरी' या नामाने स्मरण केले जात.

**आनन्दैकसुखः श्रीमान् श्यामः कमल–लोचनः।**
**गोकुलानन्दो नन्दनन्दनः कृष्ण ईर्यते॥**

एकमात्र आनंदरसविग्रह, गोकुळाचे आनंदप्रद कमललोचन, नन्दनन्दन श्रीश्यामसुंदरच 'कृष्ण' नावाने ओळखले जातात.

**वैदग्धीसारसर्वस्वं मूर्तलीलाधिदैवतम्।**
**श्रीराधां रमय नित्यं राम इत्यभिधीयते॥**

*(ब्रह्माण्ड–पुराण, उत्तर–खंड, ६/५५)*

लीलेचे मूर्तिमानविग्रह अथवा अधिष्ठातृदेव रसिक–चूडामणी विदग्ध–शिरोमणी श्रीकृष्ण श्रीमती राधिकेला निरंतर रमण करवित असतात अर्थात आनंदित करित असतात, म्हणून ते 'राम' या नावाने ओळखले जातात.

## ऐश्वर्यमयी व्याख्या—

**हरति त्रिविधं तापं जन्मकोटिशतोद्भवम्।**
**पापं च स्मरतां यस्मात्तस्माद्धरिरिति स्मृतः॥**

भगवान श्रीकृष्ण आपले स्मरण करणाऱ्या भक्तांच्या कोटी जन्मांचे त्रिविध–ताप आणि कायिक–वाचिक–मानसिक तिन्ही प्रकारच्या पापांना हरण करतात, म्हणून ते 'हरी' नावाने ओळखले जातात.

**कृषिर्भूवाचकः शब्दो णश्च निर्वृतिर्वाचकः।**
**तयोरैक्यं परं ब्रह्म कृष्ण इत्यभिधीयते॥**

'कृष्'—धातू आकर्षक सत्तावाचक आहे आणि 'ण'-शब्द निर्वृति अर्थात आनन्दवाचक आहे. या दोघांचे एकतामय आनंद-स्वरूप आकर्षक परब्रह्मच 'कृष्ण' या नावाने ओळखल्या जाते.

**रमन्ते योगिनोऽनन्ते सत्यानन्दे चिदात्मनि।**
**इति रामपदेनासौ परंब्रह्माऽभिधीयते॥**

नित्य आनंद-स्वरूप आणि चिन्मय स्वरूपाच्या ज्या श्रीकृष्णांत योगीलोक रमण करतात अर्थात क्रीडा करतात, तात्पर्य—त्यांच्या ध्यानाने आनंद प्राप्त करतात, म्हणून परब्रह्मस्वरूप ते श्रीकृष्णच 'राम'—नावाने ओळखले जातात.

## युगलस्मरणमयी व्याख्या—

**मनो हरति कृष्णस्य कृष्णाह्लादस्वरूपिणी।**
**ततो हरा श्रीराधैव तस्याः संबोधनं हरे॥**

श्रीकृष्णाची आल्हादस्वरूपिणी (ह्लादिनीशक्ती) श्रीराधा श्रीकृष्णांच्या चित्ताचे हरण करते, म्हणून श्रीराधाच 'हरा'—नावाने ओळखल्या जाते. 'हरा' शब्दाचे संबोधनात 'हरे' रूप बनते.

**अपगृह्य त्रपां धर्मं धैर्यं मानं व्रजस्त्रियः।**
**वेणुना कर्षति गृहात् तेन कृष्णोऽभिधीयते॥**

व्रजराजकुमार व्रजांगनांच्या लज्जा-धर्म-धैर्य आणि मानाचे हरण करून, आपल्या वंशीद्वारे, त्यांना आपापल्या घरातून आपल्याकडे आकर्षित करतात; म्हणून ते 'कृष्ण' या नावाने ओळखले जातात.

**रमयत्यनिशं रूप-लावण्यैर्व्रजयोषिताम्।**
**मनः पंचेन्द्रियाणीह रामस्तस्मात् प्रकीर्तितः॥**

तेच श्रीकृष्ण आपल्या रूप-लावण्य इत्यादी द्वारे व्रजांगनांचे मन आणि इंद्रियांना निरंतर आनंदित करतात, याच कारणास्तव ते 'राम' या नावाने ओळखले जातात.

## श्रीजीवगोस्वामिकृता 'महामन्त्र'-व्याख्या—

**सर्वचेतोहरः कृष्णस्तस्य चित्तं हरत्यसौ।**
**वैदग्धीसारविस्तारैरतो राधा हरा मता॥१॥**

**हरे**—श्रीकृष्णचंद्र आपल्या लोकोत्तर सौंदर्याद्वारे, सर्वांच्या चित्ताचे हरण करतात; परंतु श्रीमती राधिका आपल्या श्रेष्ठ चातुर्याचा विस्तार करून श्रीकृष्णांच्या चित्ताचे पण हरण करते, म्हणून श्रीराधिका 'हरा' मानली जाते. 'हरा' शब्दाचे संबोधन एकवचनात 'हरे' रूप

बनते ॥१ ॥

**कर्षति स्वीयलावण्यमुरलीकलनिःस्वनैः ।**
**श्रीराधां मोहनगुणाऽलंकृतः कृष्ण ईर्यते॥२॥**

**कृष्ण**—भुवनाला मोहित करणाऱ्या गुणांद्वारे अलंकृत श्रीहरी आपल्या लावण्य (सौंदर्य) आणि मुरलीच्या मधुर ध्वनीद्वारे श्रीराधिकेला आपल्याकडे आकर्षित करतात, म्हणून त्यांना 'कृष्ण' नावाने ओळखले जातात॥२ ॥

**श्रूयते नीयते रासे हरिणा हरिणेक्षणा**
**एकाकिनी रहःकुंजे हरेयं तेन कथ्यते॥३॥**

**हरे**—महापुरुषांच्या मुखातून ऐकण्यात येते की, मृगलोचना श्रीमती राधिका श्रीकृष्णांच्या द्वारे रासमंडलात विद्यमान एकांत निकुंजातून एकटीच अपहरण केली जाते, म्हणून राधिकाच 'हरा' नावाने ओळखली जाते, त्याचे संबोधनात 'हरे' रूप बनते. ॥३ ॥

**अङ्गश्यामलिमस्तोमैः श्यामलीकतकाञ्चनः ।**
**रमते राधया सार्धमतः कृष्णो निगद्यते॥४॥**

**कृष्ण**—आपल्या श्रीअंगाच्या श्यामकांतीच्या समुदायाद्वारे, जे सुवर्ण अर्थात तप्त कांचन गौरांगी श्रीमती राधेला देखील श्याम वर्णाचे बनवून टाकतात, म्हणून तेच श्रीराधारमण श्यामसुंदर 'कृष्ण' नावाने ओळखले जातात॥४॥

**कृत्वारण्ये सरः श्रेष्ठं कान्तयानुमतस्तया।**
**आकृष्य सर्वतीर्थानि तज्ज्ञानात् कृष्ण ईर्यते॥५॥**

**कृष्ण**—आपली कांता श्रीराधिकेच्या इच्छेनुसार श्रीहरींनी, गोवर्धनाच्या निकट व्रजच्या वनात श्यामकुंड नामक श्रेष्ठ सरोवर प्रकट करून त्यामध्ये सर्व तीर्थांना आकर्षित केले, या गूढ रहस्याला जाणूनच, विज्ञजन त्यांना 'कृष्ण' नावाने ओळखतात॥५ ॥

**कृष्यते राधया प्रेम्णा यमुनातटकाननम्।**
**लीलया ललितश्चापि धीरैः कृष्ण उदाहृतः॥६॥**

**कृष्ण**—धीर ललित नायक श्रीकृष्ण, श्रीराधेच्या महाभावरूपी लोकोत्तर प्रेम आणि तिच्या सोबत केल्या जाणाऱ्या लीलांद्वारे देखील यमुनातटवर्ती श्रीवृंदावनच्या कुंज काननात आकर्षित केले जातात, म्हणून धीर जन (बुद्धिमान लोक) त्यांना 'कृष्ण' नावाने संबोधन करतात॥६ ॥

**हतवान गोकुले तिष्ठन्नरिष्टं पुष्टपुङ्गवम्।**
**श्रीहरिस्तं रसादुच्चै रायतीति हरा मता॥७॥**

**हरे**—व्रजात निवास करते वेळी श्रीकृष्णांनी ज्या वेळी

वृषरूपधारी बलिष्ठ अरिष्टासुराचे प्राणसुद्धा अपहरण केले होते, त्यावेळी आनंदोल्लासपूर्वक उच्च स्वरात 'हरी-हरी' म्हणणारी श्रीराधा 'हरा' नावाने ओळखली जाते. 'हरा' शब्दाच्या संबोधनात 'हरे' रूप बनते. ॥७॥

**ह्यस्फुटं रायति प्रीतिभरेण हरिचेष्टितम्।**
**गायतीति मता धीरैर्हरा रसविचक्षणैः॥८॥**

**हरे**—श्रीराधिका, श्रीकृष्णाच्या लीलांचे कधी अस्पष्ट स्वरांत तर कधी प्रितीच्या अधिकतेमूळे उच्च स्वरात गाणाऱ्या श्रीराधेला रसविवेचनात अभिज्ञपंडितांद्वारे, ती 'हरा' नावाने ओळखले जाते, ज्याचे संबोधनात 'हरे'—रूप बनते॥८॥

**रसावेशपरिस्रस्तां जहार मुरलीं हरेः।**
**हरेति कीर्तिता देवी विपिने केलिलंपटा॥९॥**

**हरे**—वृंदावनात क्रीडापरायणा श्रीमती राधिकेने, रसाच्या आवेशात श्रीकृष्णांच्या हातातून पडलेल्या मुरलीचे अपहरण केले होते, म्हणून राधिकादेवी 'हरा' नावाने ओळखल्या जातात, ज्याचे संबोधनात 'हरे' रूप बनते॥९॥

**गोवर्धनदरीकुंजे परिरंभविचक्षणः।**
**श्रीराधां रमयामास रामस्तेन मतो हरिः॥१०॥**

**राम**—आलिंगन करण्यात चतुरशिरोमणी श्रीकृष्णांनी गोवर्धनच्या गुहारूपी-निकुंजात श्रीराधिकेच्या सोबत रमण अर्थात क्रीडा केली, म्हणून ते 'राम' नावाने ओळखले जातात. ॥१०॥

**हन्ति दुःखानि भक्तानां राति सौख्यानि चान्वहम्।**
**हरा देवी निगदिता महाकारुण्यशालिनी॥११॥**

**हरे**—महाकारुण्यशालिनी देवी राधिका भक्तांच्या समस्त दुःखाना हरण करते, आणि दररोज सुखांना प्रदान करते, म्हणून ती 'हरा' नावाने ओळखली जाते, ज्याचे संबोधन 'हरे' रूप बनते॥११॥

**रमते भजते चेतः परमानन्दवारिधौ।**
**अत्रेति कथितो रामः श्यामसुन्दरविग्रहः॥१२॥**

**राम**—भजन करणाऱ्या भक्तांचे मन, परमानंदसिंधू श्रीकृष्णात रमण करते, या कारणास्तव श्यामसुंदर विग्रह असणारे श्रीकृष्णच 'राम' नावाने ओळखले जातात. ॥१२॥

**रमयत्यच्युतं प्रेम्णा निकुञ्जवनमन्दिरे।**
**रामा निगदिता राधा रामो युक्तस्तया पुनः॥१३॥**

**राम**—श्रीमती राधिका निकुंजात श्रीहरींना प्रेमपूर्वक आनंद प्रदान करते, म्हणून 'रमयति—आनंदयति' या व्युत्पत्तीनुसार तिचेच नाम

'रामा' आहे. रामा अर्थात श्रीराधेच्या सोबत सम्मिलित झाल्यामूळे श्रीकृष्णच 'राम' नावाने ओळखले जातात.॥१३॥

**रोदनैर्गोकुले दावानलमाशयति ह्यसौ।**
**विशोषयति तेनोक्तो रामो भक्तसुखावहः॥१४॥**

**राम**—व्रजवासियांच्या रोदनाने (क्रंदनाने) परिपूर्ण व्रजात दावानल (दावाग्नी, जंगलात लागलेली आग) पान करून तिला सुकवून टाकले होते, भक्तांना रमण करविणारे तेच श्रीकृष्ण 'राम' नामाने संबोधित होतात॥१४॥

**निहन्तुमसुरान् यातो मथुरापुरमित्यसौ।**
**तदागमद्रहःकामो यस्याः सासौ हरेति च॥१५॥**

**हरे**—श्रीकृष्ण कंस आदी असुरांना मारण्यासाठी मथुरापुरीत निघून गेले होते, नंतर श्रीराधिकेला एकांतात भेटण्याच्या अभिलाषेने पुन्हा व्रजात आले होते; म्हणून मथुरा इत्यादी धामातून व्रजाकडे श्रीकृष्णांना हरण केल्यामुळे श्रीराधिकाच 'हरा'—नामाने ओळखली जाते, त्याचेच संबोधनात 'हरे' रूप बनते॥१५॥

**आगत्य दुःखहर्ता यो सर्वेषां व्रजवासिनाम्।**
**श्रीराधाहारिचरितो हरिः श्रीनन्दनन्दनः॥१६॥**

**हरे**—ज्यांनी मथुरा आणि द्वारकेतून येऊन, समस्त व्रजवासींचे दुःख हरण केले होते; म्हणून श्रीमती राधिकेच्या मनाला हरण करणाऱ्या लीलांद्वारे युक्त श्रीनंदनंदनच 'हरी' नावाने ओळखले जातात. 'हरी'—शब्दाचे संबोधनात 'हरे' असे रूप बनते॥१६॥

श्रीजीव गोस्वामीं द्वारे विरचित 'महामंत्रा'ची व्याख्या समाप्त।

## श्रीगोपालगुरुगोस्वामिकृता 'महामन्त्र'-व्याख्या—

**अज्ञानतत्कार्यविनाशहेतोः सुखात्मनः श्यामकिशोरमूर्तेः।**
**श्रीराधिकाया रमणस्य पुंसः स्मरन्ति नित्यं महतां महान्तः॥१॥**

अज्ञान आणि त्याच्या द्वारे उत्पन्न संसाररूप-व्याधीला विनष्ट करणाऱ्या, आनंदस्वरूप, श्यामकिशोरमूर्ती, श्रीराधारमणांना महाभागवतगण नित्य स्मरण करतात॥१॥

**विलोक्य तस्मिन् रसिकं कृतज्ञं जितेन्दियं शान्तमनन्यचित्तम्।**
**कृतार्थयन्ते कृपया सुशिष्यं प्रदाय नामत्रययुक्तपद्यम्॥२॥**

तेच महाभागवतगण आपल्या योग्य-शिष्यांना, त्याच श्रीराधारमणांचे अनुरागी रसिक पाहून आणि त्या शिष्याला कृतज्ञ, जितेंद्रिय, शांत आणि अनन्य चित्त असलेला समजून, कृपा करून

‘हरे कृष्ण’ इत्यादी तीन नामांनी युक्त पद, अर्थातच ‘महामंत्र’ देऊन कृतार्थ करतात ॥२॥

**महामंत्राच्या ‘हरे’ पदाची व्याख्या**

**हरिर्हरति पापानि दुष्टचित्तैरपि स्मृतः।**
**अनिच्छयापि संस्पृष्टो दहत्येव हि पावकः॥३॥**

इच्छेशिवाय स्पर्श झालेला अग्नी पण ज्या प्रकारे जाळूनच टाकतो, त्याचप्रमाणे दुष्ट चित्त असणाऱ्या मनुष्यांद्वारे कशाही प्रकारे स्मरण केल्यामुळे प्रभु त्यांच्या समस्त पापांना हरण करतात, म्हणून त्यांचे नाव ‘हरी’ आहे. ॥३॥

**विज्ञाप्य भगवत्तत्त्वं चिद्घनानन्दविग्रहम्।**
**हरत्यविद्यां तत्कार्यमतो हरिरिति स्मृतः॥४॥**

अथवा सच्चिदानन्दविग्रह-स्वरूप भगवान आपल्या नावाचे कीर्तन-स्मरण करणाऱ्याच्या हृदयात तत्त्वाची स्फूर्ती करवून अविद्या आणि तिचे कार्य अज्ञानाला हरण करतात, म्हणून तेच प्रभू ‘हरी’— नावाने स्मरण केले जातात॥४॥

**अथवा सर्वेषां स्थावरजङ्गमादीनां तापत्रयं हरतीति हरिः। यद्वा दिव्यसद्गुणश्रवणकथनद्वारा सर्वेषां विश्वादीनां मनो हरतीति। यद्वा स्वमाधुर्येण कोटिकन्दर्पलावण्येन सर्वेषामवतारादीनां हरतीति हरिः। हरिशब्दस्य संबोधने ‘हे हरे’॥५॥**

अथवा स्थावर-जंगम आदी सर्व प्राण्यांच्या तीन प्रकारच्या तापांना हरण करतात, याच कारणास्तव ते ‘हरी’ म्हणून ओळखले जातात, अथवा आपल्या अप्राकृत सद्गुणांच्या श्रवण-कीर्तनाच्या द्वारे सर्व संसारी प्राण्यांचे मन हरण करतात; म्हणून त्यांचे नाव ‘हरी’ आहे, अथवा कोटी कामदेवांपेक्षा पण अधिक आपल्या स्वाभाविक सौंदर्य माधुर्याच्या द्वारे सर्व अवतारांच्या मनांचे हरण करतात; म्हणून ते व्रजराजकुमार श्रीकृष्णच ‘हरी’ नावाने ओळखले जातात. ‘हरी’ शब्दाच्या संबोधनात ‘हरे’-रूप बनते. ॥५॥

**रासादिप्रेमसौख्यार्थे हरेर्हरति या मनः।**
**हरा सा गीयते सद्भिर्वृषभानुसुता परा॥६॥**

**स्वरूपप्रेमवात्सल्यैर्हरति या मनः।**
**हरा सा कथ्यते सद्भिः श्रीराधा वृषभानुजा॥७॥**

**हरति श्रीकृष्णमनः कृष्णाल्हादस्वरूपिणी।**
**अतो हरेत्यनेनैव श्रीराधा परिगीयते।**

**इत्यादिना श्रीराधावाचक-हरा-शब्दस्य संबोधने हरे॥८॥**

अथवा रास आदि प्रेममय सुखाला संपादन करण्यासाठी आपल्या स्वरूप-गुण-प्रेम-वात्सल्य आदी द्वारे श्रीकृष्णांच्या मनाचे पण हरण करते, म्हणून श्रीकृष्णांची ह्लादिनी-शक्ती वृषभानुनंदिनी श्रीराधाच सज्जनांच्या द्वारे 'हरा'-नावाने संबोधिली जाते, आणि गायली जाते. अशा प्रकारे राधा-वाचक 'हरा'—शब्दाचे संबोधन 'हरे'-रूप बनते.॥ ६-८॥

## महामंत्राच्या 'कृष्ण' पदाची व्याख्या

**कृषिर्भूवाचकः शब्दो णश्च निर्वृतिवाचकः।**
**तयोरैक्यं परं ब्रह्म कृष्ण इत्यभिधीयते॥९॥**

'कृष'-धातू आकर्षक, सत्तावाचक, आणि 'ण'-शब्द निर्वृति अर्थात आनंदवाचक आहे. या दोघांचे एकतामय आनंदस्वरूप सर्वाकर्षक परब्रह्मच 'कृष्ण'—नावाने ओळखल्या जाते॥९॥

**ईश्वरः परमः कृष्णः सच्चिदानन्दविग्रहः।**
**अनादिरादिर्गोविन्दः सर्वकारणकारणम्॥१०॥**

स्वयं अनादी व सर्वांचे आदी आणि सर्व कारणांचे कारण, सच्चिदानन्द विग्रह असणारे परमेश्वर गोविन्दच 'कृष्ण' नावाने ओळखल्या जातात॥१०॥

**आनन्दैकसुखः श्रीमान् श्यामः कमललोचनः।**
**गोकुलोनन्दनो नन्दनन्दनः कृष्ण ईर्यते।**
**कृष्णशब्दस्य संबोधने कृष्ण॥११॥**

एकमात्र आनंदरसविग्रह आणि गोकुळाला आनंद देणारे, कमललोचन, नंदनंदन श्रीमान श्यामसुंदरच 'कृष्ण' नावाने ओळखले जातात. 'कृष्ण'—शब्दाच्या संबोधनात 'कृष्ण' असे रूप बनते॥११॥

## महामंत्रात 'राम' पदाची व्याख्या

**राशब्दोच्चारणाद्देवि ! बहिर्निर्यान्ति पातकाः।**
**पुनः प्रवेशकाले तु मकारश्च कपाटवत्॥१२॥**

श्रीशंकर पार्वतीला म्हणाले की हे देवी! 'राम' शब्दाचे पहिले अक्षर 'रा' शब्दाच्या उच्चारणाने समस्त पापे शरीराच्या बाहेर निघतात, पुन्हा प्रवेश करतेवेळी तर 'म' कार तोंडावर दरवाजासारखा लागतो, म्हणून पापे पुन्हा प्रवेश करू शकत नाहीत ॥१२॥

**रमन्ते योगिनोऽनन्ते सत्यानन्दे चिदात्मनि।**
**इति रामपदेनादः परंब्रह्माऽभिधीयते॥१३॥**

योगिजन चिन्मय, अनंत, सत्य आणि आनंदस्वरूप ज्या परतत्त्वात रमण करतात, ते परतत्व परं ब्रह्मच 'राम' नावाने ओळखले जाते॥१३॥

**वैदग्धीसारसर्वस्वं मूर्तलीलाधिदैवतम्।**
**श्रीराधां रमयन् नित्यं राम इत्यभिधीयते॥१४॥**

रसमयी लीलेचे मूर्तिमंत अधिष्ठातृदेव चतुरशिरोमणी रसिकशेखर श्रीकृष्ण श्रीमती राधिकेला नित्य रमण करवित असतात, म्हणून तेच 'राम' नावाने ओळखले जातात॥१४॥

**श्रीराधायाश्चित्तमाकृष्य रमते क्रीडतीति रामः।**
**रामशब्दस्य संबोधने राम॥**

**तथा हि क्रमदीपिकायां चन्द्रं प्रति श्रीकृष्णः—**
**मम नामशतेनैव राधानाम सदुत्तमम्।**
**यः स्मरेत्तु सदा राधां न जाने तस्य किं फलम्॥१५॥**

अथवा श्रीराधिकेच्या चित्ताला आपल्याकडे आकर्षित करून तिच्या सोबत रमण करतात, अर्थात क्रीडा करतात, म्हणून ते श्रीकृष्णच 'राम' नावाने ओळखले जातात. 'राम' शब्दाच्या संबोधनात 'राम' असे रूप बनते. पहा, 'क्रमदीपिके'त चंद्राप्रती श्रीकृष्णांनी म्हटले आहे की माझ्या शेकडो नावांपेक्षा 'राधा' नाम श्रेष्ठ आहे अर्थात माझ्या नामाचा शेकडो वेळा केलेल्या जपापेक्षा श्रीराधेच्या नामाचा एकदा जप करणे अधिक श्रेष्ठ आहे, जी व्यक्ती, सदा सर्वदा श्रीराधेचे स्मरण-कीर्तन करतो, तिला कोणते फळ मिळते, हे मीपण जाणत नाही॥१५॥

पुन्हा महामंत्रात प्रत्येक पदाची व्याख्या—

**हरे—कृष्णस्य मनो हरतीति हरा राधा, तस्याः संबोधने हे हरे।** श्रीमती राधिका श्रीकृष्णांचे मन हरण करते, म्हणून तीच 'हरा' नावाने ओळखली जाते. त्या 'हरा' नावाचे संबोधनात 'हे हरे' असे रूप बनते.

**कृष्ण—राधाया मनः कर्षतीति कृष्णः, तस्य संबोधने हे कृष्ण।** जे श्रीराधेच्या मनाला आकर्षित करतात, ते आहेत श्रीकृष्ण. 'कृष्ण' शब्दाच्या संबोधनात 'हे कृष्ण' असे रूप बनते.

**हरे—कृष्णस्य लोकलज्जाधैर्यादि सर्वं हरतीति हरा राधा, तस्याः संबोधने हे हरे।** श्रीराधिका, श्रीकृष्णांची लोकलज्जा-धैर्य इत्यादी सर्वांचे हरण करते. या कारणास्तव तिला 'हरा' म्हटले जाते. 'हरा'

शब्दाचे संबोधनात 'हे हरे' असे रूप बनते.

**कृष्ण—राधाया लोकलज्जाधैर्यादि सर्वं कर्षतीति कृष्णः, तस्य संबोधने हे कृष्ण।** श्रीकृष्ण, राधिकेच्या लोकलज्जा-धैर्य आदी सर्वांना आकर्षित करतात. याच कारणास्तव ते 'कृष्ण' म्हणून ओळखले जातात. 'कृष्ण' शब्दाच्या संबोधनात 'हे कृष्ण' असे रूप बनते.

**कृष्ण—यत्र यत्र राधा तिष्ठति गच्छति वा तत्र तत्र सा पश्यति कृष्णो मां स्पृशति, बलात कञ्चुकादिकं सर्वं हरतीति कृष्णः, तस्य संबोधने हे कृष्ण।** श्रीराधिका जेथे जेथे असते किंवा जाते, ती तेथे तेथे पहाते की श्रीकृष्ण माझा स्पर्श करीत आहेत आणि बलपूर्वक माझी कंचुकी (चोळी) आदी सर्वांना आकर्षण करित आहेत. त्यामुळे ते 'कृष्ण' म्हणून ओळखले जातात. 'कृष्ण' शब्दाच्या संबोधनात 'हे कृष्ण' असे रूप बनते.

**कृष्ण—पुनर्हर्षतां गमयति वनं कर्षतीति कृष्णः, तस्य संबोधने हे कृष्ण।** ते श्रीराधेला हर्षित करतात आणि वंशी वाजवून वृदांवनाकडे आकर्षित करतात. म्हणून 'कृष्ण' या नावाने ओळखले जातात. 'कृष्ण' शब्दाच्या संबोधनात 'हे कृष्ण' असे रूप बनते.

**हरे—यत्र कृष्णो गच्छति तिष्ठति वा तत्र तत्र पश्यति राधा ममाग्रे पार्श्वे सर्वत्र तिष्ठति विहरति इति हरा राधा, तस्याः संबोधने हे हरे।** श्रीकृष्ण ज्या स्थानी जातात किंवा बसतात, ते त्या त्या स्थानी पाहतात की, श्रीराधा माझ्या मागेपुढे, माझ्या आजूबाजूला चारीकडे विराजमान (उपस्थित) आहे—सगळीकडे विहार करित आहे. म्हणून ती 'हरा' या नावाने ओळखली जाते. 'हरा' शब्दाच्या संबोधनात 'हे हरे' असे रूप बनते.

**हरे—पुनस्तं कृष्णं हरति स्वस्थानमभिसारयतीति हरा राधा, तस्याः संबोधने हे हरे।** तीच पुन्हा श्रीकृष्णांचे हरण करते, अर्थात आपल्या संकेत-स्थानाकडे श्रीकृष्णांचा अभिसार करविते; म्हणून श्रीराधाच 'हरा' नावाने ओळखली जाते. या 'हरा' नावाचे संबोधनात 'हे हरे' असे रूप बनते.

**हरे—कृष्णं वनं हरति वनमागयतीति हरा राधा, तस्याः संबोधने हे हरे।** श्रीकृष्णांना वनाकडे हरण करते, अर्थात वृंदावनाकडे हरण करते; म्हणून श्रीराधाच 'हरा' म्हणून ओळखली जाते. ज्याचे संबोधनात 'हे हरे' असे रूप बनते.

**राम—रमयति तां नर्मनिरीक्षणादिनेति रामः, तस्य संबोधने हे राम।** श्रीकृष्ण आपल्या हास्य-विनोद, दर्शन आदी द्वारे श्रीराधिकेला

रमण करवितात, अर्थात आनंदित करतात, म्हणून त्यांचेच नाव 'राम' आहे. ज्याचे संबोधनात 'हे राम' असे रूप बनते.

**हरे—तात्कालिक धैर्यावलंबनादिकं कृष्णस्य हरतीति हरा राधा, तस्याः संबोधने हे हरे।** श्रीकृष्णांचे तात्कालिक धैर्य–अवलंबन इत्यादीचे हरण करते, म्हणून श्रीराधाच 'हरा' आहे. ज्याचे संबोधनात 'हे हरे' असे रूप बनते.

**राम—चुम्बन–स्तनाकर्षणालिङ्गनादिभिः रमते इति रामः, तस्य संबोधने हे राम।** श्रीकृष्ण चुंबन, स्तन–आकर्षण आणि आलिंगन इत्यादी द्वारे श्रीराधिकेच्यासोबत रमण अर्थात क्रीडा करतात; म्हणून ते पण 'राम' नामाने ओळखले जातात. ज्याचे संबोधनात 'हे राम' असे रूप बनते.

**राम—पुनस्तां पुरुषोचितां कृत्वा रमयतीतिः रामः, तस्य संबोधने हे राम।** श्रीकृष्ण राधिकेला पुरुषाकार बनवून तिच्या सोबत पुन्हा रमण करतात, म्हणून ते 'राम' नावाने ओळखले जातात. ज्याचे संबोधनात 'हे राम' असे रूप बनते.

**राम—पुनस्तत्र रमते इति रामः, तस्य संबोधने हे राम।** तेथे पुनःपुन्हा त्याचप्रकारे रमण करतात, त्याच कारणास्तव ते 'राम' नामाने ओळखले जातात. ज्याचे संबोधनात 'हे राम' असे रूप बनते.

**हरे—पुनः रासान्ते कृष्णस्य मनो हृत्वा गच्छतीति हरा राधा, तस्याः संबोधने हे हरे।** रासलीलेच्या शेवटी, पुन्हा श्रीकृष्णांचे मन हरण करून निघून जाणारी राधाच 'हरा' नावाने ओळखली जाते. ज्याचे संबोधनात 'हे हरे' असे रूप बनते.

**हरे—राधाया मनो हृत्वा गच्छतीति हरिः कृष्णः, तस्य संबोधने हे हरे।** श्रीकृष्णपण रासलीलेच्या शेवटी, राधिकेचे मन हरण करून निघून जातात, म्हणून तेच 'हरि' म्हणून ओळखले जातात. ज्याचे संबोधनात 'हे हरे' असे रूप बनते.

श्रीगोपाल गुरु गोस्वामी द्वारे विरचित 'महामंत्र' व्याख्या समाप्त.

## श्रीरघुनाथदासगोस्वामिकृता 'महामन्त्र'–व्याख्या—

**एकदा कृष्णविरहाद् ध्यायन्ती प्रियसङ्गमम्।**
**मनोवाष्पनिरासार्थं जल्पतीदं मुहुर्मुहुः॥**

**हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे।**

श्रीहरिनाम महामंत्र

हरे राम हरे राम राम राम हरे हरे॥

हे हरे—स्वनामश्रवणमात्रेण स्वमाधुर्येण च मच्चेतो हरसि।

तत्र हेतुः हे कृष्ण इति। कृष् शब्दस्य सर्वार्थः णश्च आनन्दस्वरूप इति स्वार्थे णः। सच्चिदानन्दस्वरूपक इति स्वीयेन सार्वदिकपरमानन्देन सर्वाधिकपरमानन्देन वा प्रलोभ्य इति भावः।

ततश्च हे हरे—वंशीवादने मम धैर्यलज्जागुरुभयादिकम् अपि हरसि।

ततश्च हे कृष्ण—स्वाङ्गसौरभेण मां स्वगृहेभ्यो वृन्दावनं प्रत्याकर्षसि।

ततश्च हे कृष्ण—वनं प्रविष्टाया मे कञ्चुकीं सहसैवागत्य कर्षसि।

ततश्च हे कृष्ण—स्वाङ्गलावण्येन सर्वाधिकानन्देन च मां प्रलोभ्य मत् कुचौ कर्षसि (नखैराकर्षसि)।

ततश्च हे हरे—स्वबाहुनिबद्धां मां पुष्पशय्यां प्रति हरसि।

ततश्च हे हरे—तत्र निवेशिताया मे अन्तरीयमपि बलाद्धरसि।

हे हरे—अन्तरीयवसनहरणमिषेणात्मविरहपीडां सर्वामेव हरसि।

ततश्च हे राम—स्वच्छन्दं मयि रमसे।

ततश्च हे हरे—यदवशिष्टं मे किञ्चिद् वाम्यमासीत्तदपि हरसि।

ततश्च हे राम—मां रमयसि स्वस्मिन् पुरुषायितामपि करोषि।

ततश्च हे राम—रमणीयचूडामणे! तव नवीनवक्त्रमाधुर्यमपि निःशंकं तदात्मानं तव रामणीयकं मन्नयनाभ्यां द्वाभ्यामेवाऽऽस्वाद्यते इति भावः।

ततश्च हे राम—रमणं रमः, रमस्य भावः रामः हे राम! तदा त्वं साक्षाद् रमणाधिदेवभावरूपोऽप्राकृतकन्दर्प एव भवसि, अथवा न केवलं रमणरूपेणापि रमणकर्तुरमणप्रयोजकः किन्तु तद्भावरूपा रतिमूर्तिरिव त्वं भवसीति भावः।

ततश्च हे हरे—मच्चेतनामृगीमपि हरसि, मामानन्दमूर्च्छितां करोषीति भावः।

यता हे हरे—सिंहस्वरूप! तदापि त्वं रतिकर्मणि सिंह इव महाप्रागल्भ्यं प्रकटयसीति भावः।

एवंभूतेन त्वया प्रेयसा वियुक्ताऽहं क्षणमपि कल्पकोटिमिव यापयितुं कथं प्रभावामीति स्वयमेव विचारय इति नाम षोडशकस्याऽभिप्रायः। ततश्च नामभिश्चुम्बकैरिव कृष्णः कृष्णया सहसैवाऽऽकृष्टो मिलितपरमानन्द एव। तस्याः स्वसखीनां

**तत्परिवारवर्गस्य तद्भावसाधकानामर्वाचीनानामपि श्रीराधाकृष्णौ मानसं संपूरयतः।**

इति श्रीरघुनाथदासगोस्वामिविरचिता 'महामन्त्र'-व्याख्या समाप्ता।

## श्रीसच्चिदान्दभक्तिविनोदठक्कुरउद्धृता 'महामंत्र' व्याख्या—

**हे हरे—मच्चित्तं हृत्वा भवबन्धान्मोचय। हे हरे!** माझ्या चित्ताचे हरण करून, मला भवबंधनातून विमुक्त करून टाका.

**हे कृष्ण—मच्चित्तमाकर्ष।** हे कृष्ण! माझ्या चंचल चित्ताला आपल्याकडे आकर्षित करून घ्या.

**हे हरे—स्वमाधुर्येण मच्चित्तं हर।** हे हरे! आपल्या स्वाभाविक माधुर्याने माझे चित्त हरण करून टाका.

**हे कृष्ण—स्वभक्तद्वारा भजनज्ञानदानेन मच्चित्तं शोधय।** हे कृष्ण! आपल्या भक्तितत्ववेत्त्या (भक्ति-तत्त्व जाणणाऱ्या) भक्तांच्या द्वारे आपल्या भजनाचे ज्ञान देऊन माझ्या चित्ताला शुद्ध बनवा.

**हे कृष्ण—नामरूपगुणलीलादिषु मन्निष्ठां कुरु।** हे कृष्ण! आपल्या नाम-रूप-गुण-लीला आदींमध्ये माझी निष्ठा उत्पन्न करावी.

**हे कृष्ण—रुचिर्भवतु मे।** हे कृष्ण! आपल्या नाम-रूप-गुण-लीला आदींमध्ये माझी रुची उत्पन्न व्हावी.

**हे हरे—निजसेवायोग्यं मां कुरु।** हे हरे! मला आपल्या सेवेच्या योग्य बनवावे.

**हे हरे—स्वसेवामादेशय।**—हे हरे! मला सेवेच्या योग्य बनवून आपल्या सेवेचा आदेश द्या.

**हे हरे—स्वप्रेष्ठेन सह स्वाभीष्टलीलां श्रावय।** हे हरे आपल्या प्रियतम भक्तांच्या सोबत मला आपल्या अभीष्ट लीला ऐकवा.

**हे राम—प्रेष्ठया सह स्वाभीष्टलीलां मां श्रावय।** हे राम! हे राधिकारमण! प्रियतमा श्रीराधिकेसोबत केल्या गेलेल्या आपल्या अभीष्ट लीलांचे मला श्रवण करवावे.

**हे हरे—स्वप्रेष्ठेन सह स्वाभीष्टलीलां मां दर्शय।** हे हरे! हे श्रीमती राधिके! तु मला आपल्या प्रियतम श्रीकृष्णांसोबत आपल्या अभीष्ट लीलांचे दर्शन करवावे.

**हे राम—प्रेष्ठया सह स्वाभीष्टलीलां मां दर्शय।** हे राम। हे राधिकारमण! आपल्या प्रियतमेसोबत आपल्या अभीष्ट लीलांचे दर्शन करवावे.

**हे राम—नामरूपगुणलीलास्मरणादिषु मां योजय।** हे राम! आपण मला कृपया आपल्या नाम, रूप, गुण, लीला आणि स्मरण आदींमध्ये नियुक्त करावे.

**हे राम—तत्र मां निजसेवायोग्यं कुरु।** हे राम! त्या लीलेमध्ये मला आपल्या सेवेच्या योग्य बनवावे.

**हे हरे—मां स्वाङ्गीकृत्य रमस्व।** हे हरे! मला अंगीकार करून माझ्या सोबत पण रमण करावे अर्थात मला आनंदित करावे.

**हे हरे—मया सह रमस्व।** हे हरे! माझ्यासोबत रमण करावे अर्थात माझ्या सोबत विहार करावा.

श्रीसच्चिदानन्द भक्तिविनोद ठाकूर द्वारे श्रीचैतन्यशिक्षामृत आदी ग्रंथांमध्ये उद्धृत व्याख्या समाप्त.

## छोटया बालकांसाठी सुरक्षा-कवच-मंत्र

**अव्यादजोऽङ्घ्रि मणिमांस्तवजान्वथोरू,**
**यज्ञोऽच्युतः कटितटं जठरं हयास्यः।**
**हृत्केशवस्त्वदुर ईश इनस्तु कण्ठं,**
**विष्णुर्भुजं मुखमुरुक्रम ईश्वरः कम्॥२२॥**
**चक्रयग्रतः सहगदो हरिरस्तु पश्चात्**
**तत्पार्श्वयोर्धनुरसी मधुहाऽजनश्च।**
**कोणेषु श, उरुगाय उपर्युपेन्द्र-**
**स्तार्क्ष्यः क्षितौ हलधरः पुरुषः समन्तात्॥२३॥**
**इन्द्रियाणि हृषीकेशः प्राणान् नारायणोऽवतु।**
**श्वेतद्वीपपतिश्चित्तं मनो योगेश्वरोऽवतु॥२४॥**
**पृश्निगर्भस्तु ते बुद्धिमात्मानं भगवान् परः।**
**क्रीडन्तं पातु गोविन्दः शयानं पातु माधवः॥२५॥**
**व्रजन्तमव्याद्वैकुण्ठ आसीनं त्वां श्रियः पतिः।**
**भुञ्जानं यज्ञभुक् पातु सर्वग्रहभयङ्करः॥२६॥**
**डाकिन्यो यातुधान्यश्च कुष्माण्डा येऽर्भकग्रहाः।**
**भूतप्रेतपिशाचाश्च यक्षरक्षोविनायकाः॥२७॥**
**कोटरा रेवती ज्येष्ठा पूतना मातृकादयः।**
**उन्मादा ये ह्यपस्मारा देहप्राणेन्द्रियद्रुहः॥२८॥**
**स्वप्नदृष्टा महोत्पाता वृद्धा बालग्रहाश्च ये।**
**सर्वे नश्यन्तु ते विष्णोर्नामग्रहणभीरवः॥२९॥**

*(श्रीमद्भागवत १०/५/२२-२९)*

# ‘पदकल्पतरु’मध्ये ‘महामंत्राची’ व्याख्या

**नर हरिनाम अन्तरे अछु भावह हबे भवसागरे पार।**
**धर रे श्रवणे नर हरिनाम सादरे चिन्तामणि उह सार॥**

अरे भाऊ! आपल्या हृदयात या हरिनामाचा किंचित अनुभव करू शकल्यानेच तुम्ही भवसागराच्या पार जाऊ शकाल. म्हणून तुम्ही चिंतामणीचे देखील सारस्वरूप असलेल्या या हरिनामास अत्यधिक आदरपूर्वक आपल्या श्रवणेंद्रियात (कानात) धारण करावे॥ १॥

**यदि कृत–पापि आदरे कभु मन्त्रक–राज श्रवणे करे पान।**
**श्री कृष्णचैतन्य बले हय तछु दुर्गम पाप ताप सह त्राण॥**

श्रीकृष्णचैतन्य महाप्रभू म्हणतात की जर कोणी पापी व्यक्ती कधी एकदा जरी आदरपूर्वक या मंत्रराजाचे (महामंत्राचे) श्रवणेन्द्रियाद्वारे पान करतो, तर तिची दुर्गमातील दुर्गम पापे आध्यात्मिक, आधिदैविक तथा आधिभौतिक तापांसहित नष्ट होऊन जाते.

**करह गौर–गुरु–वैष्णव–आश्रय लह नर हरिनाम–हार।**
**संसारे नाम लइ सुकृति हइया तरे आपामर दुराचार॥**

अरे भाऊ! गुरू–वैष्णव आणि श्रीगौरांग महाप्रभूंचा आश्रय ग्रहण करून तुम्ही या हरिनामरूपी हाराला धारण करावे. साधारणातील साधारण आणि दुराचारी व्यक्तीदेखील या नामाच्या बळाने सुकृती संपन्न होऊन संसारातून तरून जाईल.॥३॥

**इथे कृत–विषय–तृष्ण पहुँ–नाम–हारा यो धारणे श्रम–भार।**
**कुतृष्ण जगदानन्द कृत–कल्मष कुमति रहल कारागार॥**

विषयांच्या प्रती प्रबल तृष्णा ठेवणारा कुतृष्ण, पापांमध्ये लिप्त कुमती जगदानन्द केवळ मीच श्रीहरिनामाला त्यागून अन्यान्य साधनांमध्ये व्यस्त राहिल्यामुळे भारवाही बनलेलो आहे, ज्याच्या फलस्वरूप मी आजपर्यंत देखील या संसाररूपी कारागृहात पडलेलो आहे॥४॥

*(पदकल्पतरु. गौरपदतरंगिणी तरंग १,*
*उच्छ्वास २, पद ५९, पृष्ठ १५)*

# या कीर्तनात सन्निहित हरे कृष्ण महामंत्र

| | १ ⇩ | | ३ ⇧ | | २ ⇩ | | ४ ⇧ | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| नर | ह | रि–नाम अन्त | रे | अछु भावह | ह | बे भवसाग | रे | पार। |
| धर | रे | श्रवणे नर | ह | रि–नाम साद | रे | चिन्तमणि उ | ह | सार॥ |
| यदि | कृ | त–पापि आद | रे | कभु मंत्रक– | रा | ज श्रवणे क | रे | पान। |
| श्रीकृष्ण | ष्ण | चैतन्य बले | ह | य तछु दुर्ग | म | ताप पाप स | ह | त्राण॥ |
| कर | ह | गौर–गुरु–वै | ष्ण | व आश्रय ल | ह | नर हरिना | म | हार। |
| संसा | रे | नाम लई सु | कृ | ति हइया त | रे | आपामर दु | रा | चार॥ |
| इथे | कृ | त–विषय–तृ | ष्ण | पहुँ–नाम–हा | रा | यो धारणे श्र | म | भार। |
| कुतृ | ष्ण | जगदानन्द | कृ | त–कल्मष कु | म | ति रहल का | रा | गार॥ |

हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे।
हरे राम हरे राम राम राम हरे हरे॥

# श्रीहरिनामाचे माहात्म्य

शास्त्रांत श्रीभगवन्नामाच्या महिमेचे प्रचुर वर्णन आढळते. येथे त्यातील काही वर्णन उद्धृत केले जात आहे—

**नामाचे स्वरूप—**

**नाम चिन्तामणिः कृष्णश्चैतन्य-रसविग्रहः।**
**पूर्णः शुद्धो नित्य-मुक्तोऽभिन्नत्वान्नामनामिनोः॥१॥**

*(भक्तिरसामृतसिंधू १/२/१०८)*

'कृष्णनाम' चिंतामणिस्वरूप आणि स्वयं कृष्ण चैतन्य-रस-विग्रह, पूर्ण, मायातीत आणि नित्यमुक्त आहे, कारण नाम आणि नामीत भेद नाही आहे ॥१॥

**कलियुगात नामच सर्वसिद्धिदाता आहे—**

**कलेर्दोषनिधे राजन्नस्ति ह्येको महान् गुणः।**
**कीर्त्तनादेव कृष्णस्य मुक्तसङ्गः परं व्रजेत्॥२॥**

हे राजा! कलियुग दोषांचे भांडार आहे, परंतु त्यात एक फार मोठा गुण आहे. तो गुण हा आहे की कलियुगात भगवान श्रीकृष्णांचे संकीर्तन केल्यानेच समस्त आसक्ती सुटतात आणि भगवंताची प्राप्ती होते. ॥२॥

**कृते यद्ध्यायतो विष्णुं त्रेतायां यजतो मखैः।**
**द्वापरे परिचर्यायां कलौ तद्धरिकीर्तनात् ॥३॥**

*(श्रीमद्भागवत १२/३/५१-५२)*

सत्ययुगात भगवंताच्या ध्यानाद्वारे, त्रेतायुगात मोठमोठ्या यज्ञांद्वारे त्यांची आराधना केल्याने आणि द्वापरयुगात विधिपूर्वक त्यांची पूजेद्वारे जे फळ मिळते, ते कलियुगात केवळ भगवन्नामाचे कीर्तन केल्याने अनासायच प्राप्त होते॥३॥

**ध्यायन् कृते यजन् यज्ञैस्त्रेतायां द्वापरेऽर्चयन्।**
**यदाप्नोति तदाप्नोति कलौ संकीर्त्य केशवम्॥४॥**

*(पाद्मोत्तर खंडाच्या ४२व्या अध्यायात)*

सत्ययुगात ध्यानाद्वारे, त्रेतायुगात यज्ञांचे अनुष्ठान केल्याने आणि द्वापरयुगात परिचर्येद्वारे जे फळ प्राप्त होते, कलियुगात एकमात्र हरिनाम-कीर्तन केल्यानेच ते फळ प्राप्त होते॥४॥

**कलिकाले नामरूपे कृष्ण अवतार।**
**नाम हैते हय सर्व जगत्-निस्तार॥**
**नाम बिना कलिकाले नाहि आर धर्म।**
**सर्व-मन्त्र-सार नाम ए शास्त्र-मर्म॥५॥**

## श्रीहरिनाम महामंत्र

*(चैतन्य चरितामृत आदिलीला १७/२२, ७/७४)*

कलियुगात श्रीकृष्णच नामरूपात अवतरित झाले आहेत. नामानेच समस्त जगताचा उद्धार होतो. कलियुगात नामा शिवाय इतर साधने कोणताही धर्म नाही आहे. समस्त मंत्रांचे सार हरिनाम आहे, सगळे शास्त्र असेच सांगतात ॥५॥

**नाम–माहात्म्य–वर्णनात प्राचीन आचार्यवृंद–**

**अंहः संहरतेऽखिलं सकृदुदयादेव–सकल–लोकस्य।**
**तरणिरिव तिमिर–जलधिं जयति जगन्मङ्गलं हरेर्नाम॥६॥**

*(पद्यावली १६ संख्याधृत श्रीधरस्वामीकृत श्लोक)*

जगन्मंगल हरिनामाचा विजय होवो. ज्या प्रकारे सूर्य उदित होऊन अंधकाराचा विनाश करतो, त्याच प्रकारे हरिनाम फक्त एकदाच उदित झाल्यावर लोकांच्या समस्त पापांचे नाश करते.॥६॥

**आकृष्टिः कृतचेतसां सुमनसामुच्चाटनं चांहसा–**
**माचण्डालममूकलोकसुलभो वश्यश्च मुक्तिश्रियः।**
**नो दीक्षां न च सत्क्रियां न च पुरश्चर्यां मनागीक्षते**
**मन्त्रोऽयं रसनास्पृगेव फलति श्रीकृष्णनामात्मकः॥७॥**

*(पद्यावली १८)*

त्रिगुणातीत मुक्त कुलांच्या चित्तासाठी आकर्षकस्वरूप, चांडाळापासून वाक्–शक्तिमान व्यक्तीपर्यंत सुलभ, मुक्तिरूप ऐश्वर्याला वश करणारे, असा श्रीकृष्णनामस्वरूप ‘महांमंत्र’ जिभेवर स्पर्श होताच फळ प्रदान करतो, दीक्षा आदी सत्कार्य अथवा पुरश्चरण (मंत्रोच्चारण)—या सगळयांची किचिंतमात्र पण अपेक्षा करत नाही.॥ ७॥

**ब्रह्म साक्षात्कारापेक्षा नामोच्चारणाचा महिमा अधिक आहे–**

**यद्ब्रह्म–साक्षात्–कृति–निष्ठयापि विनाशमायाति विना न भोगैः।**
**अपैति नाम स्फुरणेन तत् ते प्रारब्ध कर्मेति विरौति वेदः॥८॥**

*(श्रीरूपगोस्वामीकृत श्रीकृष्णनाम स्तोत्र ४ श्लोक)*

हे नाम प्रभो! अवच्छिन्न तैलधारावत् ब्रह्म चिंतनाद्वारे ब्रम्ह–साक्षात्काराची निष्ठा प्राप्त झाल्यावर सुद्धा ज्या प्रारब्ध कर्माला भोगावेच लागते, ते प्रारब्ध कर्म आपल्या केवळ स्फूर्तीनेच अर्थात भक्तांच्या जिभेवर केवळ उच्चारण झाल्यानेच विनष्ट होते. या गोष्टीला वेद उच्च स्वरात परत–परत सांगतात. ॥८॥

**नामकीर्तनाची श्रेष्ठता–**

**अघच्छित्–स्मरणं विष्णोर्बह्वायासेन साध्यते।**
**ओष्ठस्पन्दनमात्रेण कीर्त्तनस्तु ततो वरम्॥९॥**

*(हरि-भक्ति-विलास ११/२३६ वैष्णव चिंतामणिवाक्य)*

विष्णूंचे स्मरण पापोच्छेदक असले तरी ते प्रचुर यत्नाद्वारेच पूर्ण होते. परंतु ओठांच्या केवळ स्पंदनानेच (अनायासेच) जे कीर्तन होते, ते स्मरणापेक्षाही श्रेष्ठ आहे. (कारण अशा प्रकारे नामकीर्तन अथवा नामाभासाच्या द्वारेच संसार बंधनातून मुक्त होता येते)॥९॥

**ध्यान-पूजा आदींपेक्षा नामकीर्तनाची श्रेष्ठता—**

**जयति जयति नामानन्दरूपं मुरारे-**
**र्विरमितनिजधर्मध्यानपूजादियत्नम्।**
**कथमपि सकृदात्तं मुक्तिदं प्राणिनां यत्**
**परममृतमेकं जीवनं भूषणं मे॥१०॥**

*(बृहद्भागवतामृतम् १/१/९)*

ज्याच्या द्वारे निजधर्म, ध्यान आणि पूजा आदी प्रयत्नांचा अंत होतो, अशा आनंदस्वरूप मुरारीच्या नामाचा जय होवो, जय होवो. हे नाम ज्या कोणत्याही प्रकारे घेतल्यावर (केवळ नामाभासानेच) जिवांना मुक्ती प्रदान करते आणि हे एकमात्र परम अमृतस्वरूप आहे, हे माझे जीवन आणि भूषण आहे ॥१०॥

**येन जन्मशतैः पूर्वं वासुदेवः समर्चितः।**
**तन्मुखे हरिनामानि सदा तिष्ठन्ति भारत॥११॥**

*(हरिभक्तिविलास ११/२३७ शास्त्रवाक्य)*

हे भरतवंश श्रेष्ठ! ज्यांनी शत-शत वर्ष पूर्व जन्मांत उचित (सम्यक) रूपाने वासुदेवांचे अर्चन केले आहे, त्यांच्या मुखातच श्रीहरींचे नाम नित्यकाळ विराजमान असते ॥११॥

**नामात देशकाल आदिचा नियम नाही आहे—**

**न देशनियमो राजन् न कालनियमस्तथा।**
**विद्यते नात्र सन्देहो विष्णोर्नामानुकीर्त्तने॥१२॥**

**कालोऽस्ति दाने यज्ञे च स्नाने कालोऽस्ति सज्जपे।**
**विष्णुः संकीर्त्तने कालो नास्त्यत्र पृथिवीतले॥१३॥**

*(हरिभक्तिविलास ११ विलास २०६ संख्याधृत वैष्णव चिन्तामणी वाक्य)*

हे राजा! विष्णूंच्या नाम-कीर्तनाच्या विषयात कोणत्याही देश अथवा काळाचा नियम नाही आहे, असे निःसंदेहपूर्वक सांगितले जाते. दान यज्ञ आणि अन्यान्य जपात काळ-नियमाचा विचार आहे, परंतु या पृथ्वीवर विष्णू नामाच्या संकीर्तनात कोणत्याही काळ आणि नियमाचे विधान नाही आहे॥१२-१३॥

**न देशनियमस्तस्मिन् न कालनियमस्तथा।**
**नोच्चिष्टादौ निषेधोऽस्ति श्रीहरेर्नाम्निलुब्धक॥१४॥**

*(हरिभक्तिविलास ११ विलास*
*२०२ संख्याधृत विष्णुधर्मोत्तरवाक्य)*

हे लुब्धक (हे लोभी व्यक्ती)! श्रीहरींच्या नाम-कीर्तनाच्या विषयात देश आणि काळाचा नियम नाही आहे. उच्छिष्ट मुखाने किंवा कशाही प्रकारे अशुद्ध अवस्थेत पण नामकीर्तन करणे निषिद्ध नाही आहे. ॥१४॥

**मधुर-मधुरमेतन्मङ्गलं मङ्गलानां**
**सकलनिगमवल्ली-सत्फलं चित्स्वरूपम्**
**सकृदपि परिगीतं श्रद्धया हेलया वा**
**भृगुवर नरमात्रं तारयेत् कृष्ण नाम॥१५॥**

*(हरि-भक्ति-विलास ११ विलास*
*२३४ संख्याधृत स्कन्दपुराण वाक्य)*

हरिनाम सर्व प्रकारच्या मंगलांमध्ये श्रेष्ठ मंगल-स्वरूप आहे, मधुर वस्तूंपेक्षा देखील सुमधुर आहे. ते सर्व श्रृति-लतांचे चिन्मय सुपक्वफल (चांगले पिकलेले फळ) आहे. हे भार्गवश्रेष्ठ! श्रद्धेने असो अथवा अवहेलनेने, मनुष्य जर स्पष्ट रूपाने एकदा जरी निरपराध होवून 'कृष्ण' नामाचे उच्चारण करेल, तर ते नाम त्याच क्षणी मनुष्याला तारते॥१५॥

**सर्वांसाठी 'नामसंकीर्तन' साधन आणि साध्य आहे—**

**एतन्निर्विद्यमानानामिच्छतामकुतोभयम्।**
**योगिनां नृप निर्णीतं हरेर्नामानुकीर्तनम्॥१६॥**

*(श्रीमद्भागवत २/१/११)*

हे राजा! निर्वेद (वैराग्य) प्राप्त, ऐकान्तिक भक्त, स्वर्ग आणि मोक्ष आदींची अभिलाषा ठेवणाऱ्या आणि आत्माराम योगी आदी सर्वांसाठी श्रीहरींच्या नावाचे पुनःपुन्हा कीर्तन तथा स्मरण करणेच परम साधन आणि साध्य आहे. पूर्ववर्ती आचार्यांनी अशाच स्थिर सिद्धांताची घोषणा केली आहे ॥१६॥

हरे कृष्ण हरे कृष्ण
कृष्ण कृष्ण हरे हरे।
हरे राम हरे राम
राम राम हरे हरे॥

# हरिनाम

*(सच्चिदानन्द श्रील भक्तिविनोद ठाकूर द्वारे लिखित)*

भव-समुद्र फारच दुस्तर [पार जाण्यास कठीण] आहे. परमेश्वराच्या कृपेशिवाय त्याला पार करणे कठीणच नाही, असंभव आहे. जीव जडापेक्षा [अचेतन म्हणजे प्राण किंवा चेतना नसलेल्या वस्तूंपेक्षा] श्रेष्ठ असूनसुद्धा स्वभावतः दुर्बळ आणि पराधीन आहे. भगवंतच जिवांचे एकमात्र रक्षक, पालक आणि त्राता आहेत. जीव अणु-चैतन्य आहे, म्हणून परम चैतन्य भगवंतांच्या अधीन आणि सेवक आहेत. परम चैतन्य परमेश्वरच जिवांचे आश्रय आहेत. हे जड-जगत मायेद्वारे रचित आहे. या जड-जगतात जिवांची स्थिती ठीक त्या प्रकारे आहे, जशी अपराधी व्यक्तींची स्थिती कारागृहात असते. भगवंताच्या विमुख झाल्यामुळे जीव मायेच्या संसारात भ्रमण करतो आहे. भगवद्-विमुख जिवांना बद्धजीव म्हटले जाते; कारण ते मायेद्वारे बांधले आहे. याच्या विपरीत जे जीव भगवंताचे अनुगत आहेत, ते मायेतून मुक्त झाले आहेत. अशा जिवांना मुक्त जीव म्हणतात. अशाप्रकारे अवस्था भेदाने(अवस्थांच्या भिन्नतेमुळे) अनंत जीव दोन भागात विभक्त आहेत—बद्ध जीव आणि मुक्त जीव.

बद्ध जीव साधनेद्वारे भगवंतांची कृपा प्राप्त करून, मायेच्या सुदृढ दोरीला तोडण्यास समर्थ आहेत. आमच्या महामहिम (अतिशय महिमान्वित, अतिशय जास्त महिमा असणाऱ्या) महर्षींनी अनेक प्रकारच्या शोध केल्या नंतर तीन प्रकारची साधने स्थिर केली आहेत —कर्म, ज्ञान आणि भक्ती.

वर्णाश्रमधर्म, यज्ञ, तपस्या, दान, व्रत, योग—यांना शास्त्रांमध्ये कर्मांग म्हटले गेले आहे. या विभिन्न कर्मांची भिन्न-भिन्न फळे पण त्या शास्त्रांत सांगितली गेली आहेत. त्या फळांवर पृथक-पृथक (विभिन्न प्रकारे) विचार केल्यावर माहीत होते की स्वर्ग-भोग, मृत्युलोकाचा भोग, रोगशांती आणि उच्च कर्मे करण्याच्या सुसंधीची प्राप्ती—हेच त्यांची प्रधान फळे आहेत. त्यात उच्च कर्मे करण्याच्या सुसंधीच्या प्राप्तिरूप फळाला वेगळे करून टाकल्यावर उरलेली समस्त प्रकारची फळे मायिक प्रतीत होतात. स्वर्ग-भोग, मर्त्यसुखभोग, ऐश्वर्य आदी फळे—ज्यांना जीव कर्मांद्वारे प्राप्त करतो —सर्व नश्वर आहेत. ही सर्व भगवंतांच्या कालचक्रात पडल्यावर विनष्ट होऊन जातात. या फळांच्या द्वारे मायेचे बंधन सुटणे तर दूरच राहिले, त्यातून अजून अधिक कर्म वासना उत्पन्न होतात.

ज्या माया-बंधनाला अजून अधिक सुदृढ करतात. उच्च कर्मांचे सुयोगरूप फळपण निरर्थकच असते, जर उच्च कर्म खरोखर केले नाही. श्रीमद्भागवतात अशा प्रकारे म्हटले आहे—

**धर्मः स्वनुष्ठितः पुंसां विष्वक्सेन-कथासु यः।**
**नोत्पादयेद् यदि रतिं श्रम एव हि केवलम्॥**

वर्णाश्रम धर्माचे व्यवस्थितपणे अनुष्ठान केल्यावर देखील जर मनुष्याच्या हृदयात श्रीभगवान आणि भागवताच्या महिमेच्या श्रवण-कीर्तनाच्या प्रती रुची उत्पन्न होत नसेल तर अशा प्रकारचे अनुष्ठान केवळ श्रमच आहेत.

वर्णाश्रम धर्माचे मूळ तात्पर्य आहे की स्वभावानुसार सांसारिक आणि शारीरिक कर्मांच्या विभागाद्वारे मनुष्य सहजपणे संसार आणि शरीर-यात्रेचा निर्वाह करू शकेल. असे केल्याने हरिकथेच्या अनुशीलनासाठी पर्याप्त (पुरेसा) वेळ मिळेल. जर कोणी मनुष्याने वर्णाश्रम धर्माचे उत्तम रूपात पालन तर केले, परंतु हरि-कथेत त्याला रुची झाली नसेल, तर त्याचे सारे धर्मानुष्ठान व्यर्थ परिश्रमच ठरते. कर्माद्वारे निश्चितपणे भवसमुद्र पार केल्या जाऊ शकत नाही—याला मी संक्षेपात सांगितले.

ज्ञानालापण उच्च गती प्राप्त करण्याचे साधन सांगितले आहे. ज्ञानाचे फळ आत्मशुद्धी आहे. परंतु या तत्त्वाला विसरून जीव जडाश्रित होवून कर्म मार्गात भटकत असतो. ज्ञान-चर्चेद्वारे हे जाणता येते की मी जड (अचेतन) नाही—चिद्-वस्तू आहे. असे ज्ञान स्वभावतः 'नैष्कर्म्य' म्हणून ओळखले जाते. याचे कारण आहे की यात चिद्-वस्तूचे थोडेसे ज्ञान शिल्लक राहिल्यावर देखील चिद्-वस्तूचा नित्यधर्म—जो चिदास्वादन आहे, प्रारंभ होत नाही. या अवस्थेला पोहोचलेले जीव आत्माराम म्हणून ओळखले जातात. परंतु जेंव्हा चिदास्वादनरूप चित्-क्रिया प्रारंभ होते, तेंव्हा नैष्कर्म्य उरत नाही. म्हणून देवर्षी नारदांनी सांगितले आहे—

**नैष्कर्म्यमप्यच्युत भाववर्जितं**
**न शोभते ज्ञानमलं निरञ्जनम्**

अर्थात नैष्कर्म्यरूप निर्मल ज्ञान पण भगवंताच्या भक्तीने स्निग्ध न झाल्यास नितांत उपेक्षणीय असते.

श्रीमद्भागवतात पण सांगितले आहे की—

**आत्मारामश्च मुनयो निर्ग्रन्थाऽप्युरुक्रमे।**
**कुर्वन्त्यहैतुकीं भक्तिमित्थम्भूतगुणो हरिः॥**

परम चैतन्य हरींमध्ये एक असा असाधारण गुण आहे, जो

समस्त जडमुक्त आत्माराम जिवांना पण आकर्षित करून आपल्या भक्तीत नियुक्त करतो.

म्हणून कर्म उच्च कर्माची सुसंधी प्रदान करून आणि ज्ञान आपले नैष्कर्म्य-स्वरूप परित्याग करून जेंव्हा भक्तिसाधन करण्यात नियुक्त होते, तेंव्हा कर्म आणि ज्ञानाला साधनाङ्ग (साधनेची अंगे) म्हटले जाऊ शकते. त्यांची स्वतः कोणतीही साधनाङ्गता (साधनेची अंगता) स्वीकृत नाही आहे. म्हणून केवळ भक्तीलाच साधन म्हटले गेले आहे. कर्म आणि ज्ञान भक्तीच्या अधीन झाल्यावर कधी-कधी साधनाच्या रूपात मानले जाते, परंतु भक्ती स्वभावतःच साधन-स्वरूप आहे. या विषयात श्रीमद्भागवताचा निर्णय स्पष्ट आहे—

**न साधयति मां योगो न सांख्यं धर्म उद्धव।**
**न स्वाध्यायस्तपस्त्यागो यथा भक्तिर्ममोर्जिता॥**

हे उद्धव! कर्मयोग, सांख्ययोग, वर्णाश्रम धर्म, वेद-पाठ, तपस्या किंवा वैराग्य मला प्रसन्न करू शकत नाही, केवळ भक्तीच मला प्रसन्न करण्यास समर्थ आहे.

भगवंतांना प्रसन्न करण्यासाठी भक्तीच्या अतिरिक्त आणि कोणताही उपाय नाही. साधन भक्ती नऊ प्रकारची असते—श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य आणि आत्मनिवेदन. त्यातील श्रवण, कीर्तन आणि स्मरण—ही तीन प्रधान साधनाङ्ग (साधनेची अंगे) आहेत. भगवंताचे नाम, रूप, गुण आणि लीला—या चार विषयांचेच श्रवण, कीर्तन आणि स्मरण होते. यातील पण श्रीनामच आदी आणि सर्व बीज-स्वरूप आहे. म्हणून हरिनामच सर्व प्रकारच्या उपासनांचे मूळ आहे. शास्त्रांत सांगितले आहे की—

**हरेर्नाम हरेर्नाम हरेर्नामैव केवलम्।**
**कलौ नास्तेव नास्त्येव नास्त्येव गतिरन्यथा॥**

कलियुगात हरिनामाव्यतिरिक्त जिवांची दुसरी गती नाही आहे. 'कलिकाल' शब्दाद्वारे हे समजले जाते की सर्व काळांमध्ये हरिनामाशिवाय जिवांची गती नाही आहे. विशेष करून कलियुगात इतर मंत्र आदी साधने दुर्बळ झाल्यामुळे केवळ हरिनामाचे अवलंबन करणे उचित आहे, कारण हरिनाम सर्वात जास्ती वीर्यशाली (बलशाली) आहे.

हरिनामसंबंधी पद्मपुराणात अशा प्रकारे लिहिलेले आहे—

**नाम चिन्तामणिः कृष्णश्चैतन्यरसविग्रहः।**
**पूर्णः शुद्धो नित्यमुक्तोऽभिन्नत्वान्नामनामिनोः॥**

श्रीजीव गोस्वामी या श्लोकाची व्याख्या करताना लिहितात—

**एकमेव सच्चिदानन्द-रसादिरूपं तत्वं द्विधाविर्भूतमित्यर्थः।**

श्रीकृष्णतत्त्व अद्वय सच्चिदानंद स्वरूप आहे. त्याचा दोन रूपांत आविर्भाव होतो—१. नामीच्या रूपात श्रीकृष्णविग्रह आणि २. नामाच्या रूपात श्रीकृष्णनाम. याचे मूलतत्त्व हे आहे की श्रीकृष्ण सर्वशक्तिमान आहेत. शक्तिमान पुरुषाचे समस्त प्रकाशच त्यांच्या शक्तीचे प्रकाश आहेत. शक्तीच आपल्या आधाररूप पुरुषाला इतरांच्या निकट प्रकाशित करते. शक्तीच्या दर्शन-प्रभावाद्वारे कृष्णरूप प्रकाशित होते आणि आह्वय(संज्ञा)-प्रभावाद्वारे कृष्णनाम विज्ञापित (सूचित) होते. म्हणून कृष्णनाम चिंतामणि-स्वरूप, कृष्ण-स्वरूप आणि चैतन्य-रस-स्वरूप आहे. नाम सर्वदा पूर्णस्वरूप आहे अर्थात त्यात विभक्तींच्या योगाने 'कृष्णाय नारायणाय' इत्यादी मंत्र आदी निर्माणाची अपेक्षा नसते. कृष्णनाम उच्चारित होताच चित्ततत्वात कृष्ण-रस अकस्मात उदित होतो. नाम सदा विशुद्ध असते अर्थात ते जडीय अक्षरांप्रमाणे जडाश्रय (अचेतन वस्तूंवर अवलंबून) नसते. नाम केवळ चैतन्य रसमात्र आहे. नाम सर्वदा मुक्त असते, म्हणून नित्यमुक्त असते, ते कधीही जड जिव्हा (जीभ) आदी पासून उत्पन्न होत नाही. ज्यांनी नाम-रसाचे पान केले आहे, तेच केवळ या व्याख्येला समजण्यास समर्थ होऊ शकतात. जे नामात जडत्वाची कल्पना करतात, स्वतः चैतन्यरसास्वादन करण्यास असमर्थ आहेत, ते या व्याख्येने संतुष्ट होऊ शकत नाहीत. जर असे म्हणाल की आम्ही निरंतर जे नाम-उच्चारण करतो, ते जडीय (भौतिक किंवा चेतना नसलेल्या) अक्षरांचा आश्रय करून तयार होते; अशा दशेत नामाला जडातून (अचेतन किंवा भौतिक सामुग्रीतून) उत्पन्न वस्तू न म्हणून नित्य मुक्त कसे म्हटले जाते? या बहिर्मुख तर्काच्या उत्तरात श्रीरूप गोस्वामी म्हणतात—

**अतः श्रीकृष्णनामादि न भवेद् ग्राह्यमिन्द्रियैः।**
**सेवोन्मुखे हि जिह्वादौ स्वयमेव स्फुरत्यदः॥**

प्राकृत वस्तूच प्राकृत इंद्रिय-ग्राह्य असते. कृष्णनाम अप्राकृत आहे. म्हणून ते कदापि प्राकृत इंद्रियग्राह्य नसते. जेंव्हा ते नाम जिभेतून प्रकाशित होते, ते केवळ आत्म्याच्या अप्राकृत आनंदाची तदुपयोगी इंद्रियात स्फूर्ती मात्र आहे. भक्त जेंव्हा आत्म्याच्या अप्राकृत रसनेने (जिभेने) कृष्णनाम उच्चारण करतात, त्यावेळी ते उच्चारित परमतत्त्व प्राकृत रसनेवर (जिभेवर) आविर्भूत होऊन नृत्य

करू लागते. आनंदाने हास्य, स्नेहाने क्रंदन (विलाप किंवा रडणे), प्रीतीने नृत्य ज्या प्रकारे अप्राकृत रसाच्या इंद्रियापर्यंत व्याप्त होतात, त्याच प्रकारे श्रीकृष्णनाम-रसाची जिभेपर्यंत व्याप्ती असते. प्राकृत रसनेद्वारे (जिभेद्वारे) कृष्णनाम उत्पन्न होत नाही. साधन काळात ज्या नामाचा अभ्यास केला जातो, ते यथार्थ नाम नाही आहे. त्याला छायानाम अथवा नामाभास म्हटले जाऊ शकते. नामाभास करता-करता क्रमोन्नती द्वारे बहुधा अप्राकृत नामात रुची होताना पाहिली जाते. वाल्मिकींचे आणि अजामिळांचे जीवन-चरित्र या विषयात ज्वलंत दृष्टांत आहेत.

जिवाची नामात रुची न होण्याचे कारण अपराध आहे. जे अपराध-रहित होऊन कृष्णनाम ग्रहण करतात, त्यांच्या हृदयात चैतन्यरस-विग्रहरूप अप्राकृत श्रीहरिनामाचा उदय होतो. अप्राकृत नामाचा उदय झाल्यावर हृदय प्रफुल्लित होते, डोळयांतून अश्रुधारा प्रवाहित होऊ लागतात आणि शरीरात सात्त्विक विकार उत्पन्न होऊ लागतात. म्हणून श्रीमद्भागवतात असे सांगितले आहे—

**तदश्मसारं हृदयं वतेदं यद्गृह्यमाणैर्हरिनामधेयैः।**
**न विक्रियेताथ यदा विकारो नेत्रे जलं गात्ररुहेषु हर्षः॥**

जीव ज्यावेळी हरिनाम ग्रहण करेल, त्या वेळी त्याचे हृदय निश्चित रूपाने विकृत होईल, डोळयात निश्चितच अश्रुधारा प्रवाहित होतील आणि शरीर अवश्यच रोमांचित होईल. जे कृष्णनामाचे उच्चारण तर करतात, परंतु ज्यांच्यात असे विकार दिसत नाहीत. त्यांचे हृदय अपराधामुळे अतिशय कठोर झालेले आहे—असे समजले पाहिजे.

निरपराध होऊन हरिनाम घेणे साधकाचे नितांत कर्तव्य आहे. म्हणून अपराधापासून वाचण्यासाठी अपराध किती प्रकारचे आहेत, याचे ज्ञान होणे आवश्यक आहे.

शास्त्रांत हरिनामाच्या संबंधी दहा प्रकारच्या अपराधांचा उल्लेख आहे—

(१) साधु-निंदा (२) शिव आदी देवतांना भगवंतांपासून वेगळे स्वतंत्र मानणे. (३) गुरूंची अवज्ञा करणे. (४) वेद आदी सत्-शास्त्रांची निंदा करणे. (५) हरिनाम-माहात्म्याला केवळ प्रशंसा मात्र समजणे. (६) हरिनामात अर्थ कल्पना अर्थात कृष्ण, राम, आदी नामे कल्पित आहेत, अशी धारणा ठेवणे. (७) नामाच्या बळावर पाप करणे. (८) इतर शुभ कर्मांना हरिनामाच्या समान समजणे. (९) अश्रद्धाळू (श्रद्धा नसलेल्या) व्यक्तींना हरिनामाचा उपदेश

करणे. (१०) नामाचे माहात्म्य श्रवण करून सुद्धा त्याच्या प्रती अविश्वास करणे.

साधुभक्तांच्या प्रती अश्रद्धा प्रकाश केल्याने आणि साधु–चरित्र महाजनांची (महान संतांची) निंदा केल्याने हरिनामाच्या प्रती अपराध होतो. म्हणून जे हरिनामाचा आश्रय ग्रहण करतील, त्यांना सर्वप्रथम वैष्णव–अवज्ञेच्या प्रवृत्तीचा सर्वतोभावेन परित्याग करायला हवा. वैष्णवांच्या कार्याप्रती संदेह (संशय) झाल्यास लगेचच निंदा न करता त्याचे तात्पर्य शोधण्याचा प्रयत्न करायला हवा. म्हणून साधुजनांवरती श्रद्धा करणेच कर्तव्य आहे.

शिव आदी देवतांना भगवंतापासून वेगळे समजणे नामापराध आहे. भगवत्–तत्त्व एक आणि अद्वितीय आहे. शिव आदी देवतांची भगवंतांपेक्षा वेगळी कोणतीही सत्ता (अस्तित्व) नाही आहे. शिव इत्यादी देवतांना भगवंतांचे गुणावतार अथवा भगवद्भक्त मानून सन्मान केल्यास भेदज्ञान राहात नाही. जे लोक महादेवांना एक पृथक अर्थात स्वतंत्र देवता मानून शिव आणि विष्णूंची पूजा करतात, ते महादेवांची भगवत्ता स्वीकार करित नाही. त्यामुळे ते विष्णू आणि शिव दोघांच्या प्रती अपराधी होतात. जे हरिनाम करतात, त्यांना या प्रकारच्या भेद–ज्ञानाचा भल्या प्रकारे त्याग करायला हवा.

गुरूदेवांची अवज्ञा करणे एक नामापराध आहे. जे नाम–तत्त्वाच्या सर्वोत्तमतेचा उपदेश देतात, त्यांना आचार्यरूपी भगवत्–प्रेष्ठ (भगवंताचे प्रिय) समजले पाहिजे. त्यांच्या प्रती दृढ भक्ती करून हरिनामात अचला (स्थिर) श्रद्धा प्राप्त करायला हवी.

कधीही सत्शास्त्रांची निंदा करू नये. वेद आदी शास्त्रांत भागवत धर्माचे वर्णन आहे—श्रीनामाचे खूपच माहात्म्य सांगितले आहे. त्या शास्त्रांची निंदा केल्याने हरिनामापराध होतो. वेद आदी शास्त्रांत सर्वत्रच हरिनामाचे माहात्म्य सांगितले आहे–

**वेदे रामायणे चैव पुराणे भारते तथा।**
**आदावन्ते च मध्ये च हरिः सर्वत्र गीयते॥**

अशा प्रकारे सत्शास्त्रांची निंदा केल्याने हरिनामात कशा प्रकारे प्रीती होऊ शकेल?

काही लोक असे समजतात की वेद आदी शास्त्रांत हरिनामाचे जे माहात्म्य वर्णन केले आहे, ती केवळ नामाची प्रशंसामात्र आहे. ज्यांची अशी धारणा आहे, ते नामापराधी आहेत. असे लोक हरिनाम करूनही हरिनामाचे वास्तविक फळ प्राप्त करत नाही. असे

लोक असे समजतात की ज्या प्रकारे कर्मकांडात रुची उत्पन्न करण्यासाठी कर्मकांडाची फुलवून प्रशंसा केली जाते, त्याच प्रकारे शास्त्रांत हरिनामाची पण वाढवून-चढवून फल-श्रुती दिली आहे. असे समजणारे फार दुर्दैवी आहेत. याच्या विपरीत भाग्यवान व्यक्तींचा विश्वास या प्रकारे असतो—

**एतन्निर्विद्यमानानामिच्छतामकुतोभयम्।**
**योगिनां नृप निर्णीतं हरेर्नामानुकीर्तनम्॥**

संसारातून निर्वेद (परम-वैराग्य) प्राप्त सर्व प्रकारच्या भयातून सुटकारा प्राप्त करण्याची इच्छा ठेवणाऱ्या योगींसाठी हरिनामाचे कीर्तनच एकमात्र कर्तव्य आहे—असा विश्वास ठेवणारी व्यक्तीच हरिनामाचे वास्तविक फळ प्राप्त करते.

नामाभास आणि नामाचा भेद न समजून काही लोक असे समजतात की नाम अक्षरमय आहे. म्हणून श्रद्धा नसून सुद्धा नाम घेतल्याने फळच मिळेल. ते अजामिळांचे उदाहरण देतात आणि "सांकेत्यं पारिहास्यं वा" आदी शास्त्र-वचनांचे उदाहरण प्रस्तुत करतात. ही गोष्ट तर पहिलेच सांगितली आहे की हरिनाम चैतन्यरसविग्रह आहे आणि प्राकृत इंद्रियग्राह्य नाही आहे. म्हणून निरापराध होऊन नामाश्रय न केल्यास नामाचा फलोदय (फळाची उत्पत्ती) संभव नाही. जे अश्रद्धापूर्वक नामोच्चारण करतात, त्यांच्यासाठी नामाचा फलोदय संभव नाही आहे. अश्रद्धाळू व्यक्तींच्या नामोच्चारणाचे फळ हे आहे की काही दिवसात त्यांची नामाप्रती श्रद्धा उत्पन्न होऊ शकते. म्हणून अश्रद्धापूर्वक अर्थवाद करून (अतिशयोक्ती समजून) नामाला जडात्मक (भौतिक) अक्षररूपात ते कर्मकांडाचे अंग समजतात अथवा असाच प्रचार करतात, ते नितांत बहिर्मुख आणि नामपराधी आहेत. वैष्णवजन या अपराधाचा प्रयत्नपूर्वक त्याग करतात.

काही लोक हरिनामाचा आश्रय घेऊन असे समजतात की आम्ही आता समस्त प्रकारच्या पापांपासून मुक्त होण्यासाठी एक स्वस्त औषध प्राप्त केले आहे. या विश्वासाने ते ठकबाजी, वाटेमारी, दरोडेखोरी, चोरी अथवा लबाडी इत्यादी पाप कर्मे करून हरिनाम करतात, ज्याने त्यांची सर्व पापे नष्ट होतील. असे समजणाऱ्या व्यक्ती नामापराधी आहेत. जे लोक नामाश्रय करतात, ते एकदा चिद्रसाचा आस्वादन करून नंतर कधीही जडीय असत् वस्तूंत आसक्त होत नाहीत.

काही लोकांचा विचार असा आहे की यज्ञ आदी कर्मे, दान

आदी धर्म, आणि तीर्थयात्रा आदी कार्ये—हे सगळे ज्या प्रकारे शुभंकर आहेत, नामसुद्धा तशीच वस्तू आहे. अशा व्यक्ती नामापराधी आहेत. नाम सदैव चिद्रसस्वरूप आहे. इतर समस्त सत्कर्मेच जडमय (भौतिक) आहेत. म्हणून ते नामाच्या विजातीय आहेत. जे लोक या क्रियांना अथवा सत्कर्मांना नामाच्या समान समजतात, ते खरोखर नामरसाचे आस्वादन करू शकत नाहीत. ज्या प्रकारे हिरा आणि काचेत भेद आहे, ठीक त्याच प्रकारे हरिनाम आणि इतर शुभ कर्मांत वस्तुगत भेद आहे.

अश्रद्धाळू व्यक्तींना उपदेश अथवा मंत्र देणाऱ्या व्यक्ती नामापराधी आहेत. ज्या प्रकारे वराहाला मुक्ताफळे (डुकराला मोती) देऊन काही लाभ नाही, उलट मुक्ताफळांचाच अपमान अथवा अवज्ञा होते, त्याचप्रकारे ज्या लोकांना हरिनामाच्या प्रती उपयुक्त श्रद्धेचा अभाव आहे, त्यांना नामोपदेश करणे नितांत अन्याय आहे. अशा लोकांना हरिनामाच्या प्रती कशा प्रकारे श्रद्धा होईल, याचा प्रयत्न करणे उचित आहे. श्रद्धा झाल्यानंतर नामोपदेश करणे उचित आहे. जे लोक आपल्या प्रती गुरू अभिमान करून अपात्र व्यक्तीला पण हरिनामाचा उपदेश करतात, ते नामापराधामुळे अधःपतित होतात.

हरिनामाचे माहात्म्य श्रवण करून सुद्धा जे नामाच्या प्रती एकांतिक श्रद्धा न करता अन्यान्य साधनांचा—कर्म, ज्ञान अथवा योग यांचा आश्रय त्याग करत नाही, ते पण नामापराधी आहेत.

अशा प्रकारे नामापराध त्याग न केल्यास हरिनाम उदित होत नाही. कलियुग-पावनावतारी श्रीश्रीचैतन्य महाप्रभूंनी संसारी जिवांच्या नाना प्रकारच्या दुःखाना पाहून दयार्द्र (दयाळू) चित्ताने असा उपदेश केला आहे—

**तृणादपि सुनीचेन तरोरपि सहिष्णुना।**
**अमानिना मानदेन कीर्तनीयः सदा हरिः॥**

आपल्याला गवतापेक्षाही तुच्छ मानून, वृक्षापेक्षाही अधिक सहिष्णू (सहनशील, सोशीक) बनून स्वतः अभिमान-शून्य आणि दुसऱ्याला मान देणारा जीव हरिनाम-संकीर्तनात अधिकार प्राप्त करतो. व्यवहार शुद्धीसोबत हरिनाम ग्रहण करण्याची व्यवस्थाच या वाणीचे मुख्य तात्पर्य आहे. जे आपल्याला सर्वात अधिक हीनदीन समजतात, ते कधीही साधूची निंदा, शिव इत्यादी देवतांत भेदबुद्धी द्वारे अवज्ञा, गुरूंची अवज्ञा आणि सत्-शास्त्रांची निंदा करू शकत नाही आणि हरिनामाच्या माहात्म्याप्रती त्यांच्या हृदयात कधीही संदेह उत्पन्न होऊ शकत नाही. ते शुष्कज्ञानजात तर्काद्वारे 'हरी' शब्दात

निर्गुण-ब्रह्मवादाची कल्पना करीत नाहीत, नामाच्या बळावर पाप-कर्मे करीत नाहीत, दुसऱ्या सत्कर्मांना हरिनामाच्या समान समजत नाहीत, अश्रद्धाळू व्यक्तींना हरिनाम देत नाहीत आणि नामाच्या प्रती तीळमात्रही अविश्वास ठेवत नाहीत. ते स्वभावतः दहा प्रकारच्या नामापराधांपासून दूर राहण्याचा प्रयत्न करतात. कोणीही उपहास केल्यावर अथवा अहित केल्यावरसुद्धा ते त्याच्यावर उपकारच करतात (त्याचे भलेच करतात). ते जगातील समस्त कार्ये करूनसुद्धा स्वतः आपल्यात भोक्ता अथवा कर्ता असा अभिमान ठेवत नाहीत. ते आपल्याला जगाचे दास मानून जगाची सेवेतच व्यग्र असतात.

अशा अधिकारी व्यक्तींच्या मुखातून जेंव्हा हरिनाम उच्चारित होते, तेंव्हा अंतःस्थित चित्-जगातून वीजेसारखी चित्-ज्योती व्याप्त होऊन जगाच्या जिवांच्या मायाविकाररूप अंधाराला दूर करून टाकते. म्हणून, अहो महात्मा-जन! अपराधरहित होऊन निरंतर हरिनामाचे कीर्तन करावे. हरिनामाशिवाय जिवांसाठी इतर कोणताही दुसरा आश्रय नाही आहे. या दुस्तर भवसमुद्रात बुडत्या व्यक्तीला ज्ञान अथवा कर्माचा आश्रय घेणे केवळ गवताचा आश्रय घेऊन महासागर पार करण्याच्या इच्छेसमान सर्वथा निरर्थक आहे. म्हणून हरिनामरूप महापोताचा (मोठ्या जहाजाचा) आश्रय घेऊन हा दुस्तर भवसमुद्र पार करावा.

## दंडकारण्यातील ऋषींवर भगवंतांची कृपा

दंडकारण्यात अनेक ऋषी खूप वर्षांपासून तपस्या करीत होते आणि गोपालमंत्राचा जप करीत होते, त्यांचे हृदय शुद्ध तसेच निर्मळ झाले होते. श्रीरामचंद्र वनवासकाळात जेव्हा दंडकारण्यात पोहोचले तेव्हा त्यांच्या रूपाचे दर्शन करून त्या ऋषींच्या हृदयात आपले इष्टदेव श्रीमदनमोहनांची स्फूर्ती झाली आणि त्यांच्या बरोबर प्रेयसी रूपात रमण करण्याची लालसा उत्पन्न झाली. परंतु या ऋषींचे बाह्य शरीर पुरुषाचे होते परंतु गोपालमंत्राच्या प्रभावाने प्रकटित झालेल्या आत्मस्वरूपामुळे त्यांनी स्वतःला प्रेयसी आणि भगवंतांना निजप्रिय रूपात पाहिले. हे ऋषीपण द्वापरात व्रजमध्ये गोपीरूपात जन्मले आणि भगवान श्रीकृष्णांनी त्यांची अभिलाषा पूर्ण केली.

# शास्त्रांमध्ये हरिनामाचे माहात्म्य

न देशनियमो राजन् न कालनियमस्तथा।
विद्यते नात्र सन्देहो विष्णोर्नामानुकीर्त्तने॥
कालोऽस्ति दाने यज्ञे च स्नाने कालोऽस्ति सज्जपे|
विष्णुः संकीर्त्तने कालो नास्त्यत्र पृथिवीतले॥

*(हरिभक्तिविलास ११ विलास २०६ संख्याधृत वैष्णव चिन्तामणी वाक्य)*

हे राजा! विष्णूंच्या नाम-कीर्तनाच्या विषयात कोणत्याही देश अथवा काळाचा नियम नाही आहे, असे निःसंदेहपूर्वक सांगितले जाते. दान यज्ञ आणि अन्यान्य जपात काळ-नियमाचा विचार आहे, परंतु या पृथ्वीवर विष्णू नामाच्या संकीर्तनात कोणत्याही काळ आणि नियमाचे विधान नाही आहे.

न देशनियमस्तस्मिन् न कालनियमस्तथा।
नोच्चिष्टादौ निषेधोऽस्ति श्रीहरेर्नाम्निलुब्धक||

*(हरिभक्तिविलास ११ विलास २०२ संख्याधृत विष्णुधर्मोत्तरवाक्य)*

हे लुब्धक (हे लोभी व्यक्ती)! श्रीहरींच्या नाम-कीर्तनाच्या विषयात देश आणि काळाचा नियम नाही आहे. उच्छिष्ट मुखाने किंवा कशाही प्रकारे अशुद्ध अवस्थेत पण नामकीर्तन करणे निषिद्ध नाही आहे.

मधुर-मधुरमेतन्मङ्गलं मङ्गलानां
सकलनिगमवल्ली-सत्फलं चित्स्वरूपम्।
सकृदपि परिगीतं श्रद्धया हेलया वा
भृगुवर नरमात्रं तारयेत् कृष्ण नाम॥

*(हरि-भक्ति-विलास ११ विलास २३४ संख्याधृत स्कन्दपुराण वाक्य)*

हरिनाम सर्व प्रकारच्या मंगलांमध्ये श्रेष्ठ मंगल-स्वरूप आहे, मधुर वस्तूंपेक्षा देखील सुमधुर आहे. ते सर्व श्रुति-लतांचे चिन्मय सुपक्वफल (चांगले पिकलेले फळ) आहे. हे भार्गवश्रेष्ठ! श्रद्धेने असो अथवा अवहेलनेने, मनुष्य जर स्पष्ट रूपाने एकदा जरी निरपराध होवून 'कृष्ण' नामाचे उच्चारण करेल, तर ते नाम त्याच क्षणी मनुष्याला तारते॥१५





नित्यलीलाप्रविष्ट ॐ विष्णुपाद अष्टोत्तरशत श्रीश्रीमद्भक्तिप्रज्ञान केशव गोस्वामी महाराज. आपण श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त स्वामी महाराजांना संन्यास प्रदान केला. जसे श्री कुरेशांनी श्रीरामानुजाचार्यांच्या प्राणांचे रक्षण केले होते, आपण पण आपला जीव धोक्यात घालून प्राणघातक हल्ल्यातून श्रील भक्तिसिद्धान्त सरस्वती ठाकूरांचे रक्षण केले होते. आपण श्रीधाम मायापूर येथील श्रीभक्तिविनोद ईंस्टिट्यूटला रविवारच्या ऐवजी एकादशी आणि पंचमीला साप्ताहिक सुट्टी प्रदान केली होती. एकादशी माधव-तिथी आहे. पंचमी तिथी श्रीमती सरस्वती देवी आणि श्रील भक्तिसिद्धान्त सरस्वती प्रभुपाद यांची शुभ आविर्भाव तिथी आहे. आपण दररोज तीन लाख हरिनामांचा जप करीत असत.

नित्यलीलाप्रविष्ट ॐ विष्णुपाद अष्टोत्तरशत श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त स्वामी महाराज. आपण पाश्चात्य देशात हरिनाम आणि एकादशी माहात्म्याचा प्रचार केला. आपल्या तिरोभावापूर्वी श्रील भक्तिवेदान्त नारायण गोस्वामी महाराजांना आपल्या शिष्यांना मदत करण्याची आपण विनंती केली होती. ही आज्ञा शिरोधार्य मानून श्रील गुरुदेव नित्यलीलाप्रविष्ट ॐ विष्णुपाद अष्टोत्तरशत श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त नारायण गोस्वामी महाराजांनी चाळीस विश्व-प्रदक्षिणा करीत श्रीगौरवाणीचा प्रचार केला.

